# फांस

( डब्ल्यू. ओ. सॉमिन् यांच्या ' अटेन्शन ' या नाटकाचें मराठी रूपान्तर )

अनंत काणेकर

किंमत दोन रुपये

प्रकाशक
रा. ज. देशमुख,
देशमुख आणि कंपनी,
१९१ शनवार, पुणें २

मुद्रक
न. वि. सरदेशपांडे,
आदर्श मुद्रणालय,
३९५।५ सदाशिव, पुणें २


२ मुखपृष्ठ दीनानाथ दलाल

या नाटकाचा पहिला प्रयोग शनिवार ता. ७ एप्रिल १९४९ रोजीं संध्याकाळीं ६-३० वाजतां सुंदराबाई हॉल येथें 'इंडियन नॅशनल थिएटर' या संस्थेनें केला.

*भूमिका*

मिरा-लीला चिटणीस
अमृत-के. नारायण काळे

सोमिन् यांच्या 'अटेन्शन्' या नाटकाचें 'फांस' हें मराठी रूपांतर आहे. मूळ नाटकाचा शेवट,– तो तिला आंत घेऊन जातो, एका गोळीनें तिला ठार करतो, दुसरी स्वतःवर झाडून घेतो, प्रेक्षकांना आंतून बंदुकीचे दोन आवाज ऐकूं येतात, सखी धोबीण बाहेरून दार ठोठावते, रेडिओ चालूच असतो, कुणी ओ देत नाहीं तेव्हां बाहेरूनच 'मी हा तुमचा चुकून नेलेला लाल मफलर घ्या' म्हणून ती दरवाजाच्या वरच्या फटींतून तो आंत टाकते, रेडिओवर मध्येंच –' हा खून राजकीय हेतूनें केलेला नसावा' असा पोलिसांचा तर्क असल्याची बातमी येते, आणि नंतर जोरजोरानें संगीत सुरूं होतें,– असा आहे. या नाटकाचे दिग्दर्शक माझे मित्र श्री. के. नारायण काळे यांच्या सल्ल्यानें मी तो शेवट बदलला आहे. तो बरा आहे कीं वाईट आहे हें रसिकांनीं ठरवावें.

सोमिन्च्या नाटकाचें हें रूपांतर माझ्या हातून होण्याचें सर्व श्रेय श्री. प्रभाकर गुप्ते यांना आहे. त्यांना तें रंगभूमीवर आणावयाचें होतें, आणि मोठ्या हौसेनें त्यांनीं तें माझ्याकडून करून घेतलें. कांहीं कारणांमुळें त्यांना तें त्या वेळीं, म्हणजे १९४३ सालीं आणतां आलें नाहीं. तेव्हांपासून नाटकाचें हस्तलिखित तसेंच पडून होतें. इंडियन नॅशनल थिएटरचे उत्साही कार्यकर्ते श्री. ठाकूर आणि श्री. भेंडे यांनीं तें वाचलें आणि इंडियन नॅशनल थिएटरतर्फे रंगभूमीवर आणावयाचें ठरविलें. अशी ध्येयवादी संस्था आणि के. नारायण काळे आणि लीलाताई चिटणीस यांच्यासारखे नटनटीच अवघ्या दोन पात्रांवर उभारलेलें सोमिन्चें हें अभिनव नाटक करण्याचें धाडस करूं शकतात.

— अनंत काणेकर

# फांस

## अंक पहिला

*(स्थळ :—घाटकोपर-विखरोळी रस्त्यावरल्या एका जुनाट एकमजली चाळींतली एक जोडखोली. वेळ संध्याकाळीं सात साडेसातची.)*

मिरा:— अग बाई ! साडेसात वाजले !

*[ छत्री कोंपऱ्यांत ठेवते, मनीबॅग टेबलावर टाकते आणि कॉटवर पडलेलं, घरांत नेसायचें पातळ घेऊन पडदा बाजूला करून आंत जाते. पडदा पुन्हां नीट ओढून घेते. पडद्यामागें ती कपडे बदलते आहे. दोनतीन मिनिटांनीं पडदा बाजूला करून ती भराभर स्टोव्ह पेटवूं लागते. घाईघाईनें मोरीच्या धक्क्यावरल्या भांड्यांतलं पाणी एका टोपांत घेऊन ती स्टोव्हवर ठेवते आणि मोरीकडे येऊन तांदुळ धुऊं लागते. हीं कामें चालू असतां ती सारखी टेबलावरल्या घड्याळाकडे पहात आहे. स्टोव्हवरल्या टोपांत धुतलेले तांदुळ टाकल्यावर हातातलें भांडें ती बाजूला ठेवते आणि एक मोठा श्वास सोडते.]*

हं झालं एकदांचं. (घड्याळाकडे पाहून) इतका उशीर कां यांना आज ? *( घाईघाईनें नेसलेल्या पातळाच्या निऱ्या, पदर, वगैरे ती आतां ठाकठीक करते आहे. टेबलावरलं एक वर्तमानपत्र उचलून तें वाचण्याचा ती प्रयत्न करते; पण कांहीं वाचण्याच्या मन:स्थितींत ती मुळींच नाहीं. वर्तमानपत्र ती*

*बाजूला भिरकावून देते, आणि खोलींत इकडून तिकडे येरझाऱ्या घालूं लागते. दरवाजाकडे किंचित् थांबून बाहेर जिन्यावर कुणाच्या पावलांचा आवाज ऐकूं येतो आहे का म्हणून ती पहाते. पण कसलाच आवाज ऐकूं येत नाहीं. ती परत मागें येते. टेबलावरलें वर्तमानपत्र आणि पुस्तकें नीट लावून ठेवण्याचा प्रयत्न करते. नंतर भिंतीला लावलेल्या आरशासमोर जाऊन उभी रहाते आणि आपले केंस नीटनेटके करते. कुणी तरी शीळ घालीत आणि मधून मधून 'तुम्हारे रक्तसे रंजित धरणी' हें गाणें गुणगुणत वर येत असल्याचा आवाज एकदम ऐकूं येतो. दरवाजा खडखडावल्याचा आवाज ऐकूं येतो. मिरा दरवाजाकडे जाते.* ) कोण—तुम्ही ?

अमृत:– *( आंत येऊन दरवाजा लावून घेतो. )* आज अगदीं 'तुम्ही' म्हणण्याची लहर आली? एकदम सनातनी कुटुंब – पद्धतीची लहर आली कीं काय ? अं ?—का दुसऱ्या कुणाची वाट पहात होतीस ?

*( अमृतचें वय पस्तीसच्या आसपास आहे. तो एक प्रामाणिक ध्येयवेडा आहे. क्रांतीच्या तत्त्वज्ञानानें त्याचें मन भारून गेलें आहे. त्यानें एक लालभडक नेकटाय लावला आहे. आज त्यानें एकादें बीरचें ग्लास झोकलें आहे हें उघड दिसतें.)*

मिरा:– *( एकदम त्याला बिलगून )* इश्श ! असं रे काय अमृत ?

अमृत:—अं—मिरा—अशी घाबरीघुबरी झालेली कां दिसतेस तूं ? *( हॅट टेबलावर भिरकावून देतो. कोट काढून खुंटीला लावतो. )*

मिरा:-( *गोंधळून* ) अमृत—खरंच फार—

अमृत:– काय, फार काय ?

मिरा:– मला फार भीति वाटते रे – किती उशीर करतोस रोज. संध्याकाळचा काळोख पडूं लागला कीं, इथं असं एकटं भुतासारखं वावरणं माझ्या जिवावर येतं अगदीं. खरंच, फार भीति वाटते.

अमृत:– उगाच असं कांहीं तरी काय करतेस, मिरा ? नेहमींच उशीर होतो का ? आज पार्टीच्या सेंट्रल कौन्सिलची सभा होती, नी कामही फार होतं आजच्या बैठकीपुढं. *पणाचा खोटाच भाव आणून )* गंभीर आंतरराष्ट्रीय प्रश्न

आम्ही आज ! ( *मोठ्ठयांदा हंसतो आणि तिला जवळ घेऊन तिच्या तोंडाजवळ तोंड नेतो. कांहींतरी वास सहन न होऊन ती एकदम मागें सरकते.* )

मिरा:– अमृत, आज पुन्हां घेतलीस ना ?

अमृत:– एकादा बीरचा ग्लास केव्हां तरी घ्यायला कांहीं हरकत नाहीं म्हणून तूंच सांगितलं होतंस. मिरा, मग आतां कां – मीटिंग संपल्यावर त्या चंपकनं आग्रह केला म्हणून फक्त एक ग्लास बीर घेतली मी.

मिरा:– अगदीं एकच ग्लास ?

अमृत:– एक म्हणजे काय–आणखी अर्धा पाऊण ग्लास घेतली असेल – ग्लास फारच लहान होतं ग !

( *कॉटवर बसून बुटाचे बंद सोडूं लागतो* )

मिरा:– ( *मोठ्ठ्या प्रयासानं चेहेरा शांत ठेवण्याचा प्रयत्न करीत*) तुला यायला आज कित्ती उशीर झाला – मला भारीच भीति वाटूं लागली — मला वाटलं तुला कांहीं –

अमृत:- मला कांहीं काय ?–( *मोठ्ठ्यांदा हसून* ) अग, मला काय होणार ?

मिरा:– असं काय करतोस रे ? मी नाहीं सांगत जा–काळोख पडूं लागला तशी मी घाबरून गेलें, नी कांहींच्या बाहीच विचार माझ्या डोक्यांत येऊं लागले – दिवस हे असले वाईट – लढाई, महागाई, [illegible]क भुकेकंगाल झालेले. अलिकडे फार चोऱ्या, वाटमाऱ्या होतात [illegible] या रस्त्यावर. काळोख पडल्यावर आपल्या या रस्त्यानं एकटं- [illegible] जाणं फार धोक्याचं आहे म्हणतात.

[illegible]त:– ओ– हो– हो– मी घरीं नसतांना अलिकडे तूं भुताखेतांच्या [illegible] पुस्तकं वाचीत बसतेस कीं काय ? पण एक गोष्ट तूं [illegible] मिरा. चोरालाही थोडीबहुत अक्कल असते. माझ्यासारख्या [illegible] वेळ घालवायला चोरांचीं माथीं फिरलेलीं नाहींत. [illegible]ळं सावज विचार करूनच गांठतो. कांहीं तरी मिळेल

अशी आशा असल्याशिवाय उगाच कांहीं चोर कुणाच्या वाटेला जात नाहीं.

मिराः–पण किती काळोख असतो या रस्त्यावर! आधींच रस्ता आहे जंगलांतला, नि त्यांत मेले अलिकडे दिवेही लावीत नाहींत.

अमृतः–*( आपले दोन्ही हात तिच्यापुढें धरून आणि छाती पुढें काढून )* हो, खरंच. किती काळोख असतो – श्रीमंत सरदार अमृतराव जाधवांच्या बोटांवरल्या या हिऱ्यामोत्यांच्या अंगठ्या नि गळ्यांतले रत्नहार चोरांना बिचाऱ्यांना दिसणारही नाहींत ! छे, छे ! मिरा, बाकी मला कसलंही भय असलं, तरी चोर माझ्या कधीं वाटेला जाईल असं मला वाटत नाहीं.

मिराः– खरंच किती खुळी मी. *( कागदांत बांधलेलं पावाचं पुडकं सोडते )* पोळ्या करायचा कंटाळा आला होता म्हणून पाव घेऊन आलें – इराण्याकडून. टोस्ट करतें अं? *( जवळची सुरी घेऊन पाव कापते )* बरं. पण, आजच्या बैठकींत विशेष कांहीं – ?

अमृतः– विशेष कांहीं नाहीं – एकंदर परिस्थिति पहातां –

मिराः– एकंदर काय ?

अमृतः– नाहीं म्हटलं, परिस्थिति एकंदर आपल्या देशांतली काय, किंवा जगांतली काय, महायुद्धामुळं जरा कठीणच झाली आहे – तरी पण विशेष महत्त्वाचा असा निर्णय आजच्या बैठकींत आम्ही घेतला नाहीं.

मिराः– ( *अर्थपूर्ण दृष्टीनें त्याच्याकडे पहात* ) अं ? महत्त्वाचा निर्णय कांहींच नाहीं ?

अमृतः– नाहीं. जागतिक क्रांति उद्यां सकाळपर्यंत तरी होणार नाहीं, असं मला प्रामाणिकपणें वाटतं ! ( *हंसतो* )

मिराः– असं काय करतोस, रे ?

अमृतः– मग तुला काय वाटलं ? अगदीं आज रात्रींच साऱ्या हिंदुस्थानांत क्रांतीचा भडका उडणार आहे — नी आम्हीं आजच्याच बैठकींत कांहींतरी महत्त्वाचा निर्णय घेतला पाहिजे होता ?

मिराः– नाहीं. – इतकं कांहीं वाटलं नाहीं. ( *टोस्टर पेटत्या स्टोव्हवर*

*ठेवून टोस्ट करण्याची तयारी करूं लागते.* ) बैठक संपल्यावर तूं अगदीं सरळ घरीं आलास, अमृत ?

अमृत:– ( *चांचरतो. मिराच्या तोंडाकडे पहात* ) हो – हो.

मिरा: –(*टोस्ट करीत*) खूपच वेळ चालली होती म्हणायची बैठक!

अमृत:– ए – तुला काय म्हणायचं आहे ग ? बैठक लवकर संपली; पण मी त्या स्टेशनवरल्या बारमध्यें बीरच्या बाटल्या उडवीत बसलों ! – होय ना ?

मिरा:– तसं नव्हे रे – मला वाटलं –

अमृत:– तुला कांहीं वाटलं नाहीं – हें पहा, मिरा, मी तुला स्पष्ट सांगून ठेवतों. शाळेंतल्या शेंबड्या पोरासारखं मला वागवायचं सोडून दे तूं – बैठक केव्हां संपली ? – कुठल्या रस्त्यानं आलास ? रस्त्याच्या बाजूनं चालत होतास का मधून चालत होतास ? वाटेंत कुठं थांबलास ? – मला काय समजतेस ग, तूं ? तूं श्रीमंतींत वाढलीस नी मी गरीब पोरगा होतों म्हणून उठल्यासुटल्या तूं मला चालचलणुकीचे धडे देतेस कीं काय ?

मिरा:– मला मुळींच धडे द्यायचे नाहींत.

अमृत:– मग झालं तर. मी स्वतःची चांगली काळजी घेऊं शकतों. ( *स्वतःशींच हंसत* ) बाकी तूं तरी काय करणार म्हणा – तुझा इलाजच नाहीं. रावबहादुरांची मुलगी तूं – त्यांत आणखी ते होते डी. एस्. पी. – पोलीशी शिस्तींत लहानाची मोठी झालीस तूं – मला शिस्तींत धरतेस तें ठीकच आहे ! खरं सांगायचं म्हणजे, मिरा, तूं तुझ्या वडिलांच्या हाताखालच्या एकाद्या तरुण सब-इन्स्पे-क्टराशीं लग्न करायला पाहिजे होतंस – चांगला दीडशें – दोनशें रुपये पगार – फरी क्वॉर्टर्स – त्याशिवाय इतर उत्पन्न – कशाची काळजी नाहीं –

मिरा:– पुरे – पुरे, जिभेला कांहीं हाड –

अमृत:– खोटं नाहीं बोलत मी, मिरा – खरंच सांगतों – ‘भिक्का-रडा इतर जातींतला आहे कुणी तरी !’ – असंच तुझ्या घरची मंडळी तूं माझ्याशीं लग्न केलंस तेव्हां म्हणत होती, होय ना ?

बाकी त्यांत खोटं काय होतं म्हणा. फर्स्ट क्लास एम्. एस्सी. असलों तरो साठ रुपये कसे तरी मिळवणारा भिक्कारडा राजकीय चळवळ्या मी – नी वऱ्हाडांतलं एक बडं प्रस्थ – रिटायर्ड डी. एस्. पी. रावबहाद्दूर देशपांडे यांची तूं मुलगी !

मिरा:– होय – पण रावबहाद्दूर डी. एस्. पी. च्या मुलीनं एका भिक्कारड्या चळवळ्याशीं लग्न करतांना कश्शाचीही दरकार केली नाहीं—

अमृत:– ओ यस् ! आय ॲम प्राऊड् ऑफ यू, मिरा. ( *तिच्या खांद्यावर चापट्या मारीत* ) यू आर ए ब्रेव्ह गर्ल ! काय तें नाटक झालं आपल्या लग्नाच्या वेळीं – मी नको नको म्हणत असतां तूं मला आपल्या वडिलांना भेटायला घरीं नेलंस – तुझी आई नी मावशी मोठमोठ्यानं रडायला काय लागल्या – नी पिस्तूल काढून तुझे वडील माझ्या अंगावर काय धांवले – हंसूं येतं आठवण झाली म्हणजे. आणि आतां परवां पुण्याला जायला म्हणून इथं आले नी पिस्तूल इथंच टाकून गेलेत. आमच्याबद्दल त्यांना आतां एवढा विश्वास वाटतो तें ठीक आहे. पण पोलिसांचीं सतराशें लफडीं मागें असलेल्या आमच्यासारख्यांच्या घरीं ही ब्याद कशाला – उगाच जोखम – आधींच आमच्या सारख्यावर नाना संशय—

मिरा :– ( *दचकून* ) संशय ?—

अमृत:– अं ? अशी दचकतेस काय ?– आत्तां कुणी माझा संशय घेतलेला नाहीं – लग्नाच्या वेळीं तूं होतीस तितकी शूर आतां तूं राहिलेली नाहींस, मिरा – जरा कांहीं झालं कीं तूं एकदम घाबरून जातेस अलिकडे —

मिरा:– म्हणजे ? अलिकडे काय झालंय मला ?

अमृत :– अलिकडे म्हणजे काय – बायका – जातीच्याच घाबरट असतात म्हणा !–( *जरा थांबून* ) हं. मघाशीं काय विचारीत होतीस तूं ? आजच्या बैठकींत कांहीं खळबळ उडवून टाकणारं झालं का, हें तुल पाहिजे होतं, नाहीं ? एक मोठ्ठी खळबळ उडवून टाकणारी बातमी मला तुला सांगायची आहे –

मिरा :–( *एकदम दचकून* ) कांहीं वाईट बातमी नाहीं ना?

अमृत :– काय, झालंय काय तुला मिरा आज? खळबळ उडवून टाकणारी बातमी वाईटच का असावी?

मिरा :– पण – सांग ना काय ती.

अमृतः– ( *उठून भिंतीकडे जातो. आपल्या कोटाच्या खिशांत हात घालीत* ) आजचा आनंदाचा दिवस तुला आवडतं तें खायला आणून मुद्दाम "सेलेब्रेट" करायचा ठरवलं होतं मी.

मिराः–काय आणलंयस – कसला आनंदाचा दिवस?

अमृतः– आज एक मोठ्ठी गंमत झाली.

मिराः– काय?

अमृतः– (*एक लहानसं पुडकं घेऊन परत आपल्या जागेवर येऊन बसत*) आजच्या बैठकींत मला एकमतानं पार्टीचा जनरल सेक्रेटरी निवडण्यांत आलं – पार्टीसाठीं मी लिहिलेल्या 'थीसीस'मध्यें कुणाला एका काना-मात्रेची सुधारणा सुचवितां येईना – मी आंखलेल्या कार्यक्रमावर सर्वजण बेहद्द खूष झाले. आहे कीं नाहीं 'सेलेब्रेट' करण्यासारखी गोष्ट? तुला इंग्लिश चॉकोलेट आवडतात ना? म्हणून आज अगदीं महागांतल्या महाग 'बेस्ट' चॉकोलेट्‌ची पेटी घेऊन आलोंय् मी. कम् ऑन्. ईट् इट्– ( *पेटी उघडून तिच्या समोर धरतो. ती त्याच्यांतलें एक घेते. तो एक घेतो.*) काय? तुझा नवरा अगदींच कांहीं कुणी यःकश्चित् माणूस नाहीं.

मिराः– मला कित्ती आनंद झाला म्हणून सांगूं या बातमीनं!– तूं आहेसच मोठ्ठा माणूस, अमृत.

अमृतः– आहेंच मुळीं. ( *आणखी चॉकोलेट् खाऊं लागतो.* )

मिराः– पुरे – पुरे – चॉकोलेटचंच जेवण करायचंय कीं काय?

अमृतः– अग, असल्या गोष्टी वर्षांतून एकदां कधीं तरी आपण खाणार–नाहींतर कुठलीं चॉकोलेट्‌स् आलीं आहेत आपल्या नशिबीं?

मिराः– हवींत कुणाला? खळबळ उडविणारी बातमी काय ती सांगितलीसच नाहींस अजून.

अमृतः– खळबळ उडविणारी बातमी सांगतों – पण त्यापूर्वींची

हकीगत तर ऐकून घे. मी आज माझा कार्यक्रम पार्टीपुढं मांडणार होतों नी त्यावर भाषण करणार होतों, हें तुला माहित होतंच.

मिरा:– हो. मग छान झालं ना भाषण ?

अमृत:– छान म्हणजे ? ग्रेट् ! इतकं छान मी कधींच बोललों नसेन – मी स्पष्ट सांगितलं, "कॉमरेड्स, आतां या वेळेला डगमगून चालणार नाहीं आपण कामगारांचे सच्चे पुढारी असूं तर या वेळेला सार्वत्रिक संपाचा पुकार आपण केलाच पाहिजे – नाहींतर आपला पक्ष मेला, रसातळाला गेला, म्हणून समजा. सर्व भांडवलवाले एक होऊन कामगारांच्या प्रतिकारशक्तीचा कायमचा निकाल लावायला पाहाताहेत. सार्वत्रिक संप – बस् – सार्वत्रिक संप हा एकच उपाय उरला आहे . . ." (*टेबलावरल्या पाण्याच्या ग्लासचा एक घोट घेतो*) मंत्रमुग्ध झाल्यासारखे सर्वजण माझ्याकडे पहात होते, मिरा.

मिरा:– सार्वत्रिक संप होणार तर ! (*उठून पुन्हां स्टोव्हकडे कांहीं तरी कामाकरतां जाते.*)

अमृत:– होणार म्हणजे – आम्हांला संप करून उपाशी मरण्याची सुरसुरी नाहीं आलेली. हे हरामखोर मालक आम्हांला भाग पाडताहेत संप करायला – आत्तांच संप नको म्हणणारे कांहीं हरीचे लाल आमच्यांतही होतेच. मी स्पष्ट सांगितलं – संप नको असलेल्या भागूबाईनीं आमच्या पक्षांतून तोंड काळं करावं. आज आम्हांला अभेद्य, वज्रप्राय एकजूट हवी आहे – लटपटणाऱ्या लाचार लोकांना इथं जागा नाहीं. आपली बाजू न्यायाची आहे. न्यायासाठीं आपण झगडलंच पाहिजे.

मिरा:– पण प्रत्येक प्रश्नाला दोन बाजू असतात.

अमृत:– इतर प्रश्नांना असतील – या प्रश्नाला नाहींत.

मिरा:– असेल तसं कदाचित् – पण तुझ्याबद्दल मला भीति वाटते, अमृत.

अमृत:– माझी काळजी नको.

मिरा:– नको कशी ? – तूं अगदींच माथेफिरू आहेस.

अमृत:– नॉन्सेन्स् ! मी मुळींच माथेफिरू नाहीं. किती धोरणाधोरणानं मी माझं म्हणणं सर्वांना पटवून दिलं – त्याची तुला

कल्पना नाहीं. या वेळेला संपाला विरोध करून कामगारांच्या पाठींत तुम्ही बेशक सुरा खुपसणार? मी विचारलं. मला कुणींच विरोध केला नाहीं. त्यांची खात्रीच पटली.

मिरा:– ( *चिंताग्रस्त स्वरांत* ) संभाळून वागलं पाहिजेस तूं, अमृत. नाहींतर फटकन् नोकरी जायची तुझी फॅक्टरींतली.

अमृत:– नोकरी कां म्हणून जाईल?

मिरा:– म्हणजे तुझे हे सर्व उद्योग मालकांना माहीत नाहींत किंवा कळत नाहींत असं तुला वाटतं कीं काय?

अमृत:– राहूं दे ग त्या गोष्टी – पोलिसाची मुलगी असून अगदींच घाबरट आहेस तू – आणि आतां मला नोकरीची पर्वा करायचं कांहींच कारण नाहीं – बैठक संपल्यावर परत येत असतांना–

मिरा:– ( *अधीरपणें* ) परत येत असतांना काय?

अमृत:– अग, परत येत असतांना आपला तो कॉमरेड चंपक पटेल आहे ना – तो – आम्ही शेटजी कामगार-पुढारी म्हणतों तो, तो – त्यानं एक फर्स्ट क्लास ऑफर दिलीन् मला

मिरा:– कसली ऑफर?

अमृत:– आमच्या पक्षांत असला तरी श्रीमंत बापाचा पोर आहे तो – त्याच्या बापाच्या दादरला व्हिन्सेंट रोडवर दोनचार बिल्डिंग्ज आहेत म्हणे. त्यांना एक इस्टेट-मॅनेजर हवाय् – मला ती जागा मिळवून देणार आहे तो – देणार आहे म्हणजे, पाहिजे तर उद्यां-पासून मी ती घेऊं शकतों – पाऊणशें रुपये पगार, नी राहायला टॉप फ्लोअरवर तीन खोल्यांचा एक फुकट ब्लॉक – तिथंच ऑफिस ठेवायचं. तिथें टेलिफोन आहे म्हणे.

मिरा:– हं, आणखी –

अमृत:– आणखी काय पाहिजे तुला?

मिरा:– एवढं बोलणं झाल्यावर तूं सरळ घरीं आलास?

अमृत:– मिरा, या आनंदाच्या बातमीचं तुला कांहींच वाटत नाहीं?

मिरा:– वाटलं रे, पुष्कळ वाटतं. पण – हं, मग काय झालं?

अमृत:– मग काय होणार ?– चंपकला वाटलं, मी कदाचित् नाहीं म्हणेन – मी म्हटलं, अरे, मी इतका का मूर्ख आहें ? इतकी मनासारखी नोकरी मिळाल्यावर आतां पक्षाचं काम करायला मला दुप्पट जोर येईल!

मिरा:– लवकरच तुरुंगांत जाऊन बसायचा विचार दिसतोय तुझा, अमृत !

अमृत:– तुला काय, झालंय काय आज मिरा ? मला वाटलं, ही बातमी ऐकून तूं आनंदानं उड्या मारूं लागशील – आनंद राहिला दूरच. तूं तुरुंगाच्या गोष्टी बोलतेस ! नशीब माझं, फांशीं जाण्याच्या गोष्टी बोलत नाहींस !

मिरा:– या सार्वत्रिक संपाच्या भानगडींत तेंही संकट एकादे वेळीं तू स्वतःवर ओढवून घेशील – चिडलेला एखादा मालक तुझ्यावर मारेकरी घालून तुझा खून पाडायलाही कमी करणार नाहीं.

अमृत:– मारेकरी कशाला ?– एखादा मालक आपलं पिस्तूल काढून मला सरळ सरळ गोळीच घालायचा – अं –

मिरा:– ( *दचकून* ) गोळी घालायचा – हो, नेम नाहीं.

अमृत:– वः ! हं बोल पुढं – आणखी काय ? कांहीं चांगलं सांगितलं तरी आंबट तोंड करून त्यावर विरजण घालायचा तुझा निश्चयच झालेला दिसतोय् आज ! फुकट जागा नी पंचाहत्तर रुपये पगार म्हणजे आपली किती चंगळ होणार आहे, याचं तुला कांहींच वाटत नाहीं ? आतां कुणाच्या बापाचा नोकर नाहीं मी—

मिरा:– चंपकच्या ?

अमृत:– तें नांवाला ग – पण कुणा भांडवालवाल्यापुढें तोंड वेंगाडायला नको आतां – एवढा पगार नी फुकट जागा म्हणजे पैशांची यापुढें ओढाताण होणार नाहीं ती नाहींच – आपल्या उज्ज्वल भवितव्याबद्दल मी एवढं मोठं व्याख्यान झोडल्यावर तरी तुला थोडाबहुत आनंद होतोय कीं नाहीं ?

मिरा:– (*उत्साहशून्य स्वरांत*) होतोय् ना – हो – हो – खूप होतोय – *(जेवणाची मांडामांड टेबलावर करूं लागते.)*

अमृत:– आपली खूप मजा होईल नाहीं ?– बाकी सगळं राहूं दे. पण–

मिरा:– पण – काय ?

अमृत:– या घाणेरड्या खुराड्यांतून सुटूं आधीं आपण – ही काय माणसांनीं राहायची जागा आहे ? बाजूला म्हैशीचा गोठा – खालीं भज्यांचं दुकान – त्यांतून चोवीस तास वर येणारा तेलकट वास – नांव नको या चाळीचं नी घाटकोपरचं – आतां व्हिन्सेंट रोड – दादर – टॉप् फ्लोअर–

मिरा:– म्हणजे अगदीं नक्की ठरलं का जायचं ?

अमृत:– नक्की म्हणजे ? चंपकचे वडील गेलेत बाहेरगांवीं— त्यांच्या ऑफिसचं काम तोच पहातो हल्लीं. पाहिजे तर उद्यांपासून ये म्हणून त्यानं मला सांगितलंय्–

मिरा:– पण उद्यां आपण जाणार कसे ? इकडे नोटीस नको का द्यायला ?

अमृत:– तोही मुद्दा निकालांत निघालाय – आमच्या पार्टीतला तो अण्णेगिरी आहे तो – त्यानं एका पोरीशीं नुकतंच लग्न लावलंय् – एका खोलीच्या जागेसाठीं वणवण फिरतोय् तो – नाक्यावरल्या त्या कांद्याच्या वखारवाल्यानं आपल्या वखारींत झोंपायची सध्यां त्यांना परवानगी दिलीय् – पण रात्रभर दोघांच्या नाकाडोळ्यांतून पाणी वहात रहातं नी झोंप येत नाहीं म्हणतो – आपण ही खोली सोडण्याची नुसती ओझरती शक्यता मी त्याला सांगितल्याबरोबर त्यानं माझ्या गळ्याला मिठी मारलीन् ! उद्यांपासून नव्हे – आज रात्रीपासून हवी तर ही खोली घेईल तो –

मिरा:– मग उद्यां सकाळींच आपण दादरला रहायला जाऊं या, अमृत.

अमृत:– उद्यां सकाळींच ? काय म्हणतेस काय तूं ?

मिरा:– (*निश्चयपूर्वक*) या जागेंतून मला बाहेर पडलंच पाहिजे – या खुराड्यांत मला अगदीं नकोसा जीव होतो, अमृत. केव्हां केव्हां माझं डोकं फिरायला लागतं – मला अगदीं सहन होत नाहीं.

अमृत:– हद्द आहे बुवा, तुम्हां बायकांची ! एका टोंकाहून तुम्ही एकदम दुसऱ्या टोंकाला केव्हां जाल, त्याचा नेम नाहीं. कालपर्यंत—नव्हे मी आत्तां ही नवी बातमी सांगेपर्यंत तुला ही जागा आवडत होती. नी आतां हें एकदम खुराडं झालं. तुला वेड लागायला लागलं ! काय एवढं झालंय ग या जागेला ?

मिरा:– पण आतां तूंच म्हणालास ना, कीं ही घाणेरडी घोड-शाळा आहे – नी भज्यांचा वास, – शेजारीं म्हशींचा गोठा—

अमृत:– अस्सं – (*आजूबाजूला पाहतो*) मग काय उद्यां सकाळींच जागा बदलायची ? – ठीक आहे. जशी राणीसाहेबांची मर्जी – (*तिला जवळ ओढतो.*)

मिरा:– तुला मी फार त्रास देतें, अमृत; नाहीं रे ?

अमृत:– चल, वेडी कुठली ! त्रास कसला आलाय् त्यांत ? तुझ्या सुखासाठीं मी एवढंसुद्धां करूं नये कीं काय ? – मिरा, माझं तुझ्या-वर किती प्रेम आहे याची तुला पूर्ण कल्पना आहे – तूं कशीही असलीस तरी –(*हंसतो*)

मिरा:– मी कशीही काय ? अरे लबाडा ! ( *त्याचे केंस ओढते*)

अमृत:– (*हंसत*) अग, कशीही म्हणजे – ओय् – ओय् – अग सोड— (*तिच्या हातांतून केंस सोडवून घेतो. उठून कोटाकडे जातो आणि कोटाच्या खिशांतून सिगारेटचें पाकीट व काड्यांची पेटी काढीत*) तुझ्यासाठीं मी काय काय करतों याची कल्पना आहे तुला, मिरा ? आणखी घे, आणखी घे, म्हणून सगळे आग्रह करीत असतांना तुला आवडत नाहीं म्हणून फक्त एक ग्लास बीर घेतली मी – नी मग घरीं यायला उशीर होऊं नये म्हणून धांवत, पळत, भराभर चालत आलों – कुठंतरी खड्ड्यांत पडून एखादे वेळीं माझा कपाळमोक्ष झाला असता–

मिरा:– म्हणजे ?

अमृत:– म्हणजे काय ? – विखरोळीच्या जंगलांतून त्या शॉर्ट कट्नें आलों. तूं ओरडशील उशीर झाला म्हणून – काळोखांत एखाद्या खड्ड्यांत पाय पडला असता म्हणजे चांगलीच बत्तीशी रंगली असती !

मिरा:– (*एकदम घाबरून*) काय? विखरोळीच्या जंगलांतल्या शॉर्ट कटनं तूं आलास? नेहमींच्या स्टेशनच्या रस्त्यानं आला नाहींस?

अमृत:– हो – तो जवळचा नाहीं का रस्ता?

मिरा:– किती भयंकर रस्ता आहे तो जंगलांतला! रात्रीच्या वेळीं काळोखांतून त्या रस्त्यानं यायचं म्हणजे –

अमृत:– आ – हा – हा – विखरोळीचं जंगल म्हणजे अगदीं गिरनार पर्वतावरलं निबिड अरण्य कीं नाहीं – केवढे मोठेमोठे वाघ तिथं! नी सिंहांचे तर नुसते कळपच्या कळप फिरत असतात! काय तुम्ही बायका तरी – अग पांचपन्नास झाडांचं विखरोळीचं जंगल तें काय – नी तूं घाबरतेस काय? ( सिगारेट पेटवतो. )

मिरा:– पण – तूं त्या वाटेनं आलास; होय ना?

अमृत:– हो – हो. मी त्याच रस्त्यानं आलों – असं काय करतेस तूं – खटारे जाऊन जाऊन ती पायवाट झालीय ना? तिनं आलों– तुझे ते नागपूरचे बडे दोस्त सुंदरलाल बाजपायी – त्यांच्या त्या राजवाड्यासारख्या बंगल्याच्या मागल्या बाजूनं –

मिरा:–आं:!

अमृत:– कां? तो हरामखोर बडा पैसेवाला आहे – गलेलठ्ठ भांडवलवाला आहे म्हणून त्याच्या बंगल्याच्या बाजूच्या पायवाटेनंही यायचा मला अधिकार नाहीं कीं काय? तुला काय वाटतं, त्यानं मला आपल्या बंगल्याजवळ पाहिलं तर आपलं पिस्तूल झाडून तो माझा मुडदा पाडील? काय? – अशी वेड्यासारखी डोळे फाडून माझ्याकडे काय पहातेस?

मिरा:– नाहीं – मी – मी – म्हणतें –

अमृत:– तुझी अशी बोबडी वळायला काय झालं? – त्या ढेरपोट्याची तुला भीति वाटते? संपवाल्यांचा पुढारी म्हणून माझ्यावर त्यांचा दांत आहे, पण माझ्या वाटेला जायची त्याची शहामत नाहीं – मला तो चांगला ओळखून आहे – पिस्तुलाचा बकवा करतो तो मधून मधून – पण त्यानं पिस्तूल बाहेर काढायच्या आधींच टांग मारून मी त्याच्या उरावर बसेन नी त्याच्याच पिस्तुलानं त्याचा मुडदा पाडीन..

मिरा:–(*टोस्ट, केळीं, सुरी वगैरे टेबलावर घेत*) इतकी चपळाई पोलीस दाखवतील तर पहायलाच नको – जगांत फारच थोडे गुन्हे होतील – उगाच काय कांहीं तरी डोक्यांत घेऊन बसलायस् ? रात्रीं चांगली झोंप लागली म्हणजे उद्यां सकाळीं कांहीं वाटणार नाहीं तुला – घरांत थोडं ओव्हलटिन आहे – टोस्टबरोबर ओव्हलटिन पाहिजे का ?

अमृत:– मला कांहीं नको ग खायला –

मिरा:– जणुं काय तूं खरोखरच खून केलायस् असा वागतोयस् तूं, अमृत. इतका भित्रा असशील तूं, असं मला वाटलं नव्हतं.

अमृत:– भीतीचा प्रश्नच नाहीं ग – (*एक एक शब्द मोजून*) माझी सदसद्विवेकबुद्धि मला चैन पडूं देत नाहीं.

मिरा:– म्हणजे – तूं – ?

अमृत:– हो; खरं आहे तें –

मिरा:– काय ?

अमृत: – खरोखरच सुंदरलालचा कांटा माझ्या मनांत सारखा सलत असे – तो माझ्याशीं फारच गोड वागायचा प्रयत्न करायचा-- संप कमिटीचा अध्यक्ष म्हणून त्याची माझी मागें नेहमीं गांठ पडायची - पण तो जितका अधिक गोडवा दाखवण्याचा प्रयत्न करी तितका त्याचा मला अधिकच तिरस्कार वाटे – मला तो सदासर्वदा खेळवण्याचा प्रयत्न करतो आहे असा मला भास होई – या मूर्ख पोराचे सर्व डाव मला माहीत आहेत असं कांहींतरी त्याच्या डोळयांत दिसे. त्याचा खून करण्याचा विचार माझ्या डोक्यांत कधींच आला नाहीं--पण त्याचा जर खून झाला तर कांहीं वाईट नाहीं, असं मला नेहमीं वाटे -- आणि आतां खरोखरच —

मिरा: — खरोखरच काय ?

अमृत:— आणखी काय सांगायचं ? एवढं कसं तुला समजत नाहीं ?– सदासर्वदा त्याच्या खुनाचे विचार माझ्या डोक्यांत घोळा-यचे नी आतां त्याचा खरोखरच खून पडलाय – जणुं काय मीच– माझ्या विचारांनींच त्याचा खून केला असं माझी सदसद्विवेकबुद्धि

अमृतः– थोड्याच दिवसांनीं पार्टी मला कलकत्त्याला पाठवणार आहे. कांहीं दिवस तिकडच्या ज्यूट कामगार युनिअनचं काम पाहून यायचंय – आपण दोघंही जाऊं – तुला आऊटिंग पाहिजेच ना ? -अं ?

मिराः– तुझ्या राशीचं आजच्या दिवसाचं भविष्य तरी पाहिलं पाहिजे वर्तमानपत्रांत !

अमृतः– आपण कॉमरेड लोक – आपला भविष्यावर विश्वास नाहीं – हिस्टॉरिकल डिटरमिनिझम् !

मिराः– आहे खरा हिस्टॉरिकल डिटरमिनिझम् ! पण केव्हां जायचंय ?

अमृतः–बहुतेक पुढल्या–महिन्यांत जावं लागेल.

मिराः- मोठी मजा येईल कलकत्यांत; नाहीं ?

अमृतः– खूष आहेस तर तूं ? छान !

मिराः– खूष ? आज – आत्तां – रात्रीच्या गाडीनं मला कलकत्त्याला नेत असशील तरीही निघायची तयारी आहे माझी !

अमृतः– शाबास, मिरा ! कॉमरेडची बायको व्हायला लायक आहेस. गुड ओल्ड गर्ल !

मिराः– अमृत, तुझ्याबरोबर कलकत्त्यालाच काय – जगाच्या पाठीवर कुठं नेशील तिथं यायला ती तयार आहें – तूं मोठा माणूस होणार याबद्दल माझी नेहमींच खात्री होती – अमृत, तूं खात्रीनं केव्हां-तरी एक मोठ्ठा माणूस होणार – हिंदुस्थान स्वतंत्र होईल. तूं लेनिन-सारखा एक मोठ्ठा पुढारी होशील नी मग मी तुझी सेक्रेटरी म्हणून तुझ्या दिल्लींतल्या ऑफिसांत –

अमृत – ए वेडे – काल ही चाळींतली एका खोलीची जागा सोडा-यला तयार नव्हतीस – मघाशीं उद्यांच्या उद्यां दादरला जायची तयारी करूं लागलीस–नी आतां एकदम दिल्लीला माझं ऑफिस खोलायला निघालीस ? – आस्ते – आस्ते - जरा धीर धर. दिल्ली तो बहोत दूर है – सध्यां पोलिसांची नजर चुकवून लपत छपत उंदरा-सारखं कुठल्यातरी बिळांत रहावं लागतंय् – क्रांति – दिल्ली– अजून अव-काश आहे !

मिराः– असं काय रे ?

अमृत:– बरं – बरं जशी तुझी मर्जी ! – हिंदुस्थानचे भावी लेनिन कॉम-रेड अमृत जाधव – चेअरमन् ऑफ दि पीपल्स कॉमिसारियट् ऑफ दि युनायटेड स्टेट्स् ऑफ इंडिया – यांची पत्नी क्रुप्स्काया मिरा – फर्स्ट लेडी ऑफ दि लँड – यांच्या सन्मानार्थ – इराण्याकडल्या पावाचं टोस्ट आणि डाळभाताचं डिनर आतां सी. सी. आय्. च्या भव्य दिवाण-खान्यांत सुरू होईल. हा सी. सी. आय्. चा ऑर्चेस्ट्रा सुरू झाला – ( *रेडिओ लावतो. ऑर्चेस्ट्रा चालू आहे* ) झालं, मिरा ?

मिरा:– खरंच ! हा सी. सी. आय्.चा ऑर्चेस्ट्रा ?

अमृत:– ( *वर्तमानपत्र पहात* ) हो – या वेळेला आज रेडिओवर सी. सी आय्. चाच ऑर्चेस्ट्रा 'रिले' करणार होते. रेडिओनें गोर-गरिबांची मात्र चांगली सोय केलीय – तिकडे सी. सी. आय्. च्या डिनर हॉलमध्यें कडक इस्त्रीचे ड्रेस सूट घालून जो ऑर्चेस्ट्रा ऐकत बडी बडी भांडवलवाली धेंडं आपलं जेवण करताहेत, तोच ऑर्चेस्ट्रा घाटकोपरमधल्या भजांच्या दुकानावरल्या खोलींत डाळभात खाणाऱ्या कॉमरेडांच्या सेवेलाही तयार आहे ! – तुला माहीत आहे का ग, मिरा ? चंपक पटेल मला सांगत होता, अलीकडे पारशी बायकाच नव्हे तर आपल्या गुजराथी नी दक्षिणी बायकाही सी. सी. आय्. मध्यें म्हणे 'डान्स' करतात ! बाकी छान आहे हें. मी या डान्सिंगच्या युरोपिअन पद्धतीवर खूष आहें – आपल्याला वाटतं तितकं मुळींच कठीण नाहीं तें, मिरा. आमच्या कॉमरेड रोझारिओनें त्या दिवशीं थोडंसं मला शिकवलंय – अगदीं सोप आहे तें – चल ये तुला शिकवतों – ( *आजूबाजूला पहात* ) आपला हाच सी. सी. आय् !

मिरा:– ( *थट्टेच्या स्वरांत* ) बट् मि. जाधव ( *आपल्या साध्या पातळाकडे पहात* ) आय् मस्ट् ड्रेस् अप् फॉर डान्स ! वीत वीत रुंद तरी जरीच्या कांठाची साडी पाहिजे – आणतें हं आंतून – कपडे घातलेच पाहिजेत; नाहीं ?

अमृत:– थोडे कपडे काढले पाहिजेत ! – शक्य तितकी छाती, मान, दंड लोकांना दाखवायचे ही तर गांवठी साहेबांच्या गांवठी

मेमसाहेबांची अलिकडली फॅशन् - ब्लाऊझच्या बाह्या फाडून टाक म्हणजे झालं !

मिराः- खरंच, अमृत, माझी नवी साडी नेसतें मी. नी मग मला नाचायला शिकव तूं - मला पोटाशीं धरून कल्पांतापर्यंत पृथ्वीच्या पाठीवर तूं भिरभिरत रहा —

अमृतः- ( *तिच्याकडे टक लावून पहात* ) मिरा - मिरा - आज असं काय करतेस तूं ?

मिराः- ( *दूर कुठं तरी पहात* ) माझं तुझ्यावर फार फार प्रेम आहे अमृत - नी आज तर—

अमृतः- आज तर काय ? आज तू बोलतेयस खूप - पण तुझं चित्त ठिकाणावर नाहीं. तुझं मन दूर कुठं तरी भरकटतंय् !

मिराः- कित्ती जवळ आहें मी तुझ्या ! ( *त्याच्या गालाला आपला गाल लावते.* ) आहें ना अगदीं जवळ ?

अमृतः—होय. मिरा, पण -

मिराः- पण काय ? तुझी नेहमींचीच मिरा - नेहमींपेक्षांही आज तुझ्यावर अधिक प्रेम करणारी तुझी मिरा तुझ्याजवळ आहे -

अमृतः- तें खरं ग - तूं नेहमींचीच आहेस. तरी पण तुझ्यांत आज कांहीं तरी वेगळेपणा दिसतोय् - काय झालंय् कुणाला ठाऊक - पण तुझ्यांत आज कांहीं तरी ( *तिच्याकडे टक लावून पहात* ) कांहीं तरी बदल झालाय्. काय झालाय्, मिरा ?

मिराः- ( *त्याचे हात आपल्या हातांत घेऊन* ) कांहीं नाहीं रे - तुझे हात असे कांपताहेत कां ?

अमृतः- कुठं कांपताहेत ? - कांहीं तरीच - मला थोडी सर्दी झालीय नी - या थंडीच्या दिवसांत बीर घेतल्यामुळं जरा -

मिराः- जरा मी वेगळी दिसायला लागलें. होय ना ?

अमृतः- वेगळी म्हणजे काय -

मिराः- जरा बुढ्ढी ! - खरंच कारे मी अलिकडे पूर्वींइतकी चांगली दिसत नाहीं, अमृत ?

अमृतः- काय वेडी आहेस तूं ! - आज तूं वेगळी वाटतेस असं मी

म्हणालों याचा अर्थ तूं आज कमी सुंदर किंवा म्हातारी दिसतेस असं म्हणायचा माझा हेतु नव्हता – उगाच कांहीं तरी काय ?– हो. आज आपण सी. सी. आय्. मध्यें जेवण घेतों आहोंत ना ? जा. तुझी नवी साडी नेस – आपण मात्र ही इस्त्री गेलेली चेकची पँट नी हा शर्टच अंगावर ठेवणार हं – हो, आपल्याकडे ड्रेस, सूट, वगैरे कांहीं नाहीं.–

मिरा:– कसली साडी नी सी. सी. आय्. आलाय् ! मी आपलं शिवण करीत बसतें. ( *टेबलावर पडलेलें आपलें शिवण हातांत घेते.* )

अमृत:– ( *तिला चिडवतो* ) मिळेल त्या फाटक्या तुटक्या चिंधीवर,– रुमाल, पायमोजे, मफलर मिळेल त्यावर 'ए. जे.' हीं अक्षरं शिवून टाक !

मिरा:– हो– हो– घालणार जा ! शिवलेलं नांव असलं कपड्यावर, कीं धोबी जास्त काळजी घेतात.

अमृत– हो, मी तेंच म्हणतों ना – म्हणून फाटका कपडा शिवून नीट करण्यापेक्षांही त्याच्यावर आधीं नांव घालून टाकावं !–( *मोठ्यांदा हंसतो.* )

मिरा:– इतकं अगदीं हंसण्यासारखं त्यांत कांहीं नाहीं. आपली सखी धोबीण आधीं आहे बहिरी – तिच्याशीं वाद करतां करतां मला उर-स्फोड करावी लागते – तुला काय ? आधीं आपले इन् मीन् तीन कपडे. त्यांत आणखी हरवायचं कुठून ? नांव कपड्यावर शिवलेलं असलं कीं दुसराही एक फायदा आहे-

अमृत:– कोणता बुवा ?

मिरा:– कपडा कुठं विसरून राहृचला, तर तो सांपडण्याचा – कुणीं तरी उचलून न नेण्याचा अधिक संभव असतो –

अमृत:– पण अलिकडच्या तरुण मुलींना अनुभवी लोक उलटा उप-देश करतात कीं, आपल्या रुमालावर, स्कार्फवर किंवा मफलरवर चुकून सुद्धां नांव घालूं नका – संध्याकाळीं कुणाला मित्राला भेटायला जायचं असेल तर नांव घातलेला रुमाल, स्कार्फ तर मुळींच –

मिरा:– इश्श ! अमृत !

अमृत:- ओ सॉरी ! विसरलोंच. आपण आज कॉमरेड लोक नाहीं— सी. सी. आय्. मध्यें जेवणारे बडे संभावित लोक आहोंत; नाहीं ?— बरं, बरं. प्रत्येक रुमालावर, प्रत्येक टॉवेलावर, हात पुसायच्या प्रत्येक फडक्यावर, चुलीवरून आधण उतरायच्या मळक्या तुकड्यावर, फार काय बूट पुसायच्या फडक्यावरही अगदीं ढळढळीत 'ए. जे.' हीं अक्षरं शिवून ठेव हं !

मिरा:- किती म्हणून थट्टा करायची एखाद्याची, अमृत ?

अमृत:- छे, छे !-कोण टिंगल करतोय् ?-सी. सी. आय्. मधल्या संभावित बड्या धेंडासारख्या आतां आपण गोष्टी करूं या. मी सर अमृतराव जाधव ! – वेल् लेडी जाधव, हाऊ आर यू ! –थँक यू– आय् ॲम् ऑल राईट, लेडी पावनाडकर – रावबहादूर फडणीसांची मुलगी म्हणे आपल्या ड्रायव्हरचा हात धरून पळून गेली !

मिरा:- अमृत – अमृत, – काय कांहीं तरी बडबडतोयस ?

अमृत:- कांहीं तरी काय ? मोठ्या लोकांच्या बायका असल्या, नाहीं तर दुसऱ्या कसल्या गोष्टी करतात ग ? – ओ – फारच लेट् झाला – बॉय्, एक टॅक्सी बोलाव.

मिरा:- (*खो खो हंसत*) सर अमृतराव – तुम्ही सर असून तुमची स्वतःची मोटार नाहीं वाटतं ? आणि सी. सी. आय्. मध्यें बॉयला टॅक्सी बोलावायला पाठवतात काय ? दरवाजावर अटेंडन्ट उभा असतो – तो शिटी मारतो कीं टॅक्सी येते –

अमृत:- तुला ग कसं कळलं ? तूं कधीं सी. सी. आय्. मध्यें गेली होतीस कीं काय ? (*मिरा एकदम गंभीर होऊन दुसरीकडे पाहूं लागते.*) बरं एव्हां नको टॅक्सी – आपण आणखी एक डान्स करूं. (*रेडिओचा आवाज मोठा करतो.*) चल, ये मिरा – कम् ऑन्, लेडी जाधव. (*एकदम रेडिओंतलें संगीत थांबतें.*) हें काय ?

*रेडिओ:*- संगीताचा कार्यक्रम मध्येंच थांबवल्याबद्दल आम्हीं मनःपूर्वक माफी मागतों. पण एक महत्त्वाची बातमी तावडतोब जाहीर करणं भाग पडल्यामुळेंच आम्हांला असं करावं लागत आहे. ही बातमी सांगून झाल्याबरोबर आजचा कार्य-

क्रम खलास होईल. विखरोली – घाटकोपरमधल्या एका आड-वाटेवर मिल एजंटस् फेडरेशनचे जनरल सेक्रेटरी आणि मुंब-ईचे प्रख्यात गिरणीमालक श्री. सुंदरलाल बाजपेई ओ. बी. ई., सी. आय. ई., यांचा अत्यंत रहस्यमय परिस्थितींत खून झालेला आढळला – त्यांच्या घाटकोपर येथील बंगल्याच्या मागल्या बाजूनंच ही आडवाट जाते. अगदीं जवळून खुनी माणसानं त्यांना गोळी घातली असावी असं दिसतं. गोळीच्या आकारा-वरून खुनी इसमाजवळ मॉसर मेक्‌चं पिस्तुल असावं अशी पोलिसांची खात्री आहे. खुनाच्या मागें राजकीय हेतु असावा, असा पोलिसांचा आरंभीं अंदाज होता. पण मृताच्या मनगटा-वरलं सोन्याचं घडयाळ, खिशांतलं पैशाचं पाकीट आणि बोटां-तली हिऱ्याची अंगठी या वस्तू नाहींशा झालेल्या आढळल्यामुळें पैशाच्या लोभानंच कुणींतरी हा खून केला असावा, हें उघड आहे. खुनी माणसाची खबर देणारास दहा हजार रुपयांचं बक्षीस मृताच्या आप्तांनीं जाहीर केलं आहे. पोलीस कमिश-नर साहेबांच्या विनंतीवरून ही बातमी मुद्दाम ध्वनिक्षेपित करीत आहोंत. नमस्ते – आदाब अरज —

*[ रेडिओवरून ही खबर येत असतां मिरा आणि अमृत दगडी खांबा-सारखीं जागच्या जागीं निश्चल उभीं आहेत. बातमी संपतांच तीं एकमेकां-कडे भयंकर भीतिग्रस्त नजरेनें पहातात.]*

अमृतः–( *एकदम रेडिओ बंद करून* ) काय भयंकर तरी !

मिराः–( *भयभीत आवाजांत* ) फारच भयंकर ! तूं त्याच–( *जीभ चावते.*) तूं मघाशीं म्हणालास कीं, तूं त्याच रस्त्यानं आलास. तेव्हां मला भयंकर भीति –

अमृतः–(*आश्चर्यचकित होऊन*) पण त्या वेळीं तुला काय माहीत कीं –
( *मिरा एकदम तोंड फिरवून बिछान्यावरल्या उशा इकडे तिकडे करते, आणि आपला गोंधळलेला चेहरा त्याला दिसूं देत नाहीं.* ) हूं हूं–समजलों. तुला वाटलं कीं, मी त्याच रस्त्यानं आलों तेव्हां सुंदरलालऐवजीं माझाच खून झाला असता – होय ना ?

मिरा:–(*सुटकेचा श्वास सोडून*) हो–हो–तसंच वाटलं मला–तूंच नाहीं का म्हणालास कीं त्या रस्त्यांत भयंकर काळोख आहे म्हणून–खुनी माणसाला तूंच सुंदरलाल वाटला असतास तर ?–

अमृत:–तें शक्यच नाहीं–सुंदरलाल माझ्यापेक्षां कितीतरी ठेंगणा होता–खुनी माणसानं अगदीं जवळून गोळी घातली असावी, असं आत्तांच रेडिओवर नाहीं का सांगितलं ?–तशी चूक होणं शक्यच नव्हतं.

मिरा:–खुनी माणसानं अगदीं जवळून गोळी घातली असावी हें पोलिसांना कसं समजलं ?—

अमृत:–त्यांचे कांहींतरी आडाखे असतील-पिस्तूल छातीवर टेकून गोळी झाडल्याची कांहींतरी खूण सांपडली असेल–

मिरा:–छे: ! गोळी तर डोकं फोडून गेली होती—

अमृत:–अं ! (*तिच्याकडे रोखून पहात*) असं कुठं रेडिओवर सांगितलं ? फक्त जवळून झाडली असावी एवढंच ऐकलं आपण —

मिरा:– (*गोंधळते*) असं ?–मग–मग–मला वाटतं, मी कांहींतरी चुकीचं ऐकलं असावं–कांहीं का असेना– (*मान उडवून*) नाहीं तरी तुम्हां लोकांना सुंदरलालचा कांटा काढून टाकायचा होताच–तुला तर त्याचा भयंकरच तिरस्कार वाटे–पण हा असा खून होऊन तो–(*एकदम कांहींतरी निश्चय करून*) असा अमानुष खून व्हायला नको होता त्याचा –खुनी इसम सांपडला तर त्याला फांशीचीच शिक्षा झाली पाहिजे.

अमृत:– (*चिडून*) हें मला कां सांगतेस मुद्दाम ?

मिरा:– तुला ? मुद्दाम ? (*त्याच्या तोंडाकडे पहाते. दचकते.*) अमृत ? म्हणजे ?

अमृत:– म्हणजे काय ? मी काय म्हणतों तें तुला चांगलें समजतंय–

मिरा:– (*भेदरते*) छे–छे !अमृत–तसं मुळींच नाहीं माझं म्हणणं–तुझ्या हातून –

अमृत:— खून, दरोडे, वैयक्तिक अत्याचार, यांविरुद्ध माझीं किती कडक मतं आहेत हें तुला पूर्णपणें माहीत आहे–प्रत्येक व्याख्यानांत, प्रत्येक लेखांत मी हें पुन्हां पुन्हां ओरडून सांगत

आलों आहें – फार काय, खुनी माणसालाही देहांताची शिक्षा होऊं नये हें मी अनेक सभांतून, अनेक परिषदांतून गेलीं कित्येक वर्षें प्रतिपादन करतों आहें–निदान मला तरी तूं तसं खोंचून बोलायला नको होतंस –

मिरा:– (*शांतपणें*) मी तुझी क्षमा मागतें, अमृत. खरोखरच माझ्या बोलण्याचा तसा हेतु नव्हता.

अमृत:– ( *गंभीरपणें वक्तृत्व करूं लागतो.*) मानवी जीवन ही जगांतली एक अत्यंत पवित्रतम गोष्ट मी समजतों – यापेक्षां दुसरं आणखी कांहीं पवित्र आहे असं मला वाटतच नाहीं मुळीं – प्रत्येक माणसाला हक्कानं आपलं म्हणतां येईल असं कांहीं जगांत असेल तर तें त्याचं जीवन. तें त्याच्यापासून हिरावून घेण्याचा कुणालाही अधिकार नाहीं. न्यायाधीशालाही नाहीं. एकानं दुसऱ्याचा खून केला म्हणून आपण त्याचा खून करायचा ? हा शुद्ध रानटीपणा आहे. फांशीची शिक्षा देणाऱ्या न्यायाधीशालाच शेवटचं गळफांस ओढण्याचं काम करायला सांगितलं पाहिजे – म्हणजे मग तो कुणाला पुन्हां फांशीची शिक्षा देणार नाहीं–जगांतून युद्धं नाहींशीं करायचीं असतील तरीही हाच उपाय योजला पाहिजे–युद्ध सुरू करणाऱ्या आणि चालू ठेवणाऱ्या झाडून साऱ्या मुत्सद्यांना सर्वांच्यापुढें आघाडीवर नेऊन उभं केलं पाहिजे—

मिरा:– ( *शांतपणें* ) फांशीपेक्षां जन्मठेपेची शिक्षा चालेल तुला ? (*तो स्तब्ध उभा आहे. ती निश्चयपूर्वक बोलते.*) मला जर कुणीं विचारलं तर जन्मठेपेपेक्षां मी मृत्यूचीच शिक्षा पत्करीन.

अमृत:— स्वतःच्या हातांनीं स्वतःचा जीव घेणें आणि दुसऱ्या कुणीं तरी आपला प्राण घेणें यांत खूपच फरक आहे.

मिरा:– मग – मग – तुझ्यावर असा कांहीं प्रसंग आला तर तूं आत्महत्या करशील ? अं ?

अमृत:– हो. प्रश्नच नाहीं मुळीं. पुरे झालं, बुवा. हा भलताच वादविवाद कशाला चालवलाय आपण ? आपला यांत संबंध काय ?

मिरा:– ( *जपून बोलते.*) हो, आपल्याला काय करायचंय – पण –

अमृतः—( दचकून ) काय ? काय म्हणायचंय् तुला ?

मिराः– आज संध्याकाळच्या तुमच्या पक्षाच्या बैठकींत तूं सुंदरलालला सपाटून शिव्या हांसडल्या होत्यास, होय ना ?

अमृतः– होय – पण प्रत्येक सभेंत मी त्याला शिव्या हांसडतोंच – आतांपर्यंत शेंकडों वेळां मीं त्याच्या बेचाळीस पिढ्यांचा उद्धार केला असेल – पण – ह्यो. आज – (*स्वतःशीं हंसतो.*)

मिराः– काय, आज काय ?

अमृतः– आजच्या सभेंत असल्या लोकांना पिसाळलेल्या कुत्र्यासारखे गोळ्या घालून मारले पाहिजेत असें मी म्हणालों होतों खरं – काय योगायोग आहे तरी ! – मोठा चमत्कारिक योगायोग आहे; नाहीं ?

मिराः– च – च – च ! आजच्याच सभेंत अगदीं हेच शब्द उच्चारल्याशिवाय एवढं काय अडलं होतं ? आजच तुला ही दुर्बुद्धि कशी सुचली ?

अमृतः– (*विचार करीत*) खरंच, काय दुर्बुद्धि सुचली कुणाला ठाऊक ! (*तिच्याकडे पहात भरभर बोलतो.*) हें बघ, मिरा, आज संध्याकाळीं मी त्या वाटेनं घरीं आलों हें चुकूनसुद्धां कुणाकडे बोलूं नकोस हं –

मिराः– तुला तिकडून येतांना कुणीं पाहिलेलं नाही ना ?

अमृतः– मला तरी कुणी आजूबाजूला दिसलं नाहीं, बुवा.

मिराः– अगदीं खात्री आहे तुझी ? कुणी दिसलं नाहीं ?

अमृतः– (*तिच्याकडे चमकून पहात*) अगदीं खात्री आहे माझी ? मिरा, तुला काय, सुचवायचं आहे तरी काय ?

मिराः– (*गोंधळून*) छे ! कांहीं नाहीं.

अमृतः– (*तिच्या मनांतला आशय आपणाला आतां पूर्णपणें कळला अशा आवेशांत तो ताडकन् उठून उभा राहातो.*) मिरा, तुला खरोखरच मी – मी सुंदरलालचा खून केला असेल, असं वाटतं ?

मिराः– मला काय वाटतं हा प्रश्न नाहीं, अमृत. इतरांना काय वाटेल हा प्रश्न आहे. संध्याकाळच्या सभेंत पिसाळलेल्या कुत्र्यासारखा त्याला गोळी घालून मारला पाहिजे, असे उद्‌गार तूं काढलेस – नंतर नेहमींची वाट सोडून त्याच्या घरामागल्या आडवाटेनं तूं

आलास – तुझं भाषण ऐकणारांपैकीं एखाद्यानं तुला त्या वाटेवर जर पाहिलं असेल तर अर्धाअधिक आरोप तुझ्यावर सिद्ध झाल्यासारखाच आहे की—

अमृतः– ( *त्याच्या डोक्यांत प्रकाश पडूं लागतो.* ) खरं आहे तुझं म्हणणं, मिरा – खाजगी सभेंत का होईना पण तसं बोलायला नको होतं मी – गाढवपणाच झाला तो माझा समजा, मला कुणीं पाहिलं असेल – हो, कदाचित् खरोखरच खून करणाऱ्या इसमानं पाहिलं असेल तर – त्यानं एक निनांवी पत्र लिहून पोलिसांना कळवायचा अवकाश कीं तो सुटलाच – मिरा, आतां काय, करायचं काय ?

मिरा:– त्या आडवाटेनं संध्याकाळचा कधीं येऊं नकोस म्हणून मी तुला नेहमीं सांगतें —

अमृत:– आतां मागलं उकरून काढूं नकोस ग – पुढं काय करायचं तें सांग – ( *अस्वस्थपणें इकडून तिकडे फेऱ्या घालीत* ) नवऱ्यावर एखादं मोठं संकट आलं म्हणजेच बायकोच्या प्रेमाची खरी परीक्षा होते. आणि बहुतेक बायका याच वेळीं माघार घेतात.

मिरा:– असं काय बोलतोस रे ? मी एवढंच म्हटलं कीं, मी नको नको म्हणत असतां तूं नेहमीं त्या वाटेनं यायचास नी मला उगाच काळजी वाटायची —

अमृत:– आतां तूं भरपूर काळजी करण्यासारखं खरोखरच कांहीं तरी झालंय – कर आतां पोटभर काळजी ! – ( *एकदम त्याला कांहीं तरी आठवण होते. कपाळावर हात मारून* ) अरे देवा !

मिरा:— काय ?

अमृत:– आपल्याकडे तुझ्या बाबांचं तें पिस्तूल पडलंय् तें मॉसर मेक्‌चंच आहे की. सकाळीं हातांत खेळवतांना मॉसर हा शब्द त्याच्यावर पाहिल्याचं मला पक्कं आठवतं.

मिरा:— पण – तें कांहीं संध्याकाळीं तुझ्या खिशांत नव्हतं – माझ्या ट्रंकेंत कपड्यांखालीं तें अगदीं सुखरूप आहे.

अमृत:– तें खरंच. पण –

( *जिन्यावर पावलांच आवाज ऐकूं येतात.* )

मिराः— ( *घाबरून उठते* ) श्ः – कुणीतरी वर येतंय्.

अमृतः– अं ?

( *दोघेंही श्वासही न सोडतां ऐकत उभीं रहातात. खिडकीच्या कांचेवर एकदोन आकृति दिसतात. त्या पुढें निघून जातात – मिरा आणि अमृत श्वास सोडतात.* )

मिराः— ( *खुर्चीवर अंग टाकीत* ) भयंकर आहे सर्व हें ! आतां कित्येक दिवस असं जीव मुठींत धरून घालवावे लागणार ! – जरा कांहीं खुट्ट झालं – जरा कुठं जिन्यावर कुणाचं पाऊल वाजलं, कीं –

अमृतः— ( *शांतपणें* ) मी निर्दोष आहें – हें पूर्णपणें सिद्ध करणारा कांहीं तरी पुरावा आपणाला शोधून काढलाच पाहिजे.

मिराः– पण तूं खरोखर निर्दोष असशील तर तुझ्यावर आरोप सिद्ध होणें शक्यच नाहीं – ( *त्याच्याकडे रोखून पहात* ) तू आहेसच निर्दोष – आहेस ना ?

अमृतः– तुला काय वाटतं, निर्दोष माणसं फांशी जात नाहीत ? पुष्कळ वेळां असं होतं, पांचदहा वर्षांनीं खरा पुरावा बाहेर येतो नी मग दिलगिरीपूर्वक जाहीर करण्यांत येतं कीं, पांच वर्षांपूर्वी अमक्या अमक्या गुन्ह्यासाठीं फांशी दिलेला अमका अमका माणूस पूर्ण निर्दोष होता ! काय चाटायची आहे ती दिलगिरी ? – आपला निरपराधीपणा आपणाला सिद्ध करतां आला नाहीं, तर सगळं कांहीं फुकट आहे.

मिराः– पण खरा खुनी माणूस पोलिसांना सांपडणारच नाहीं असं कां तूं धरून चालतोस ? बहुतेक त्यांना खरा गुन्हेगार सांपडेलच.

अमृतः– ( *तिच्याकडे रोखून पहात* ) अं ?

मिराः– उगाच काय डोक्याला त्रास करून घेण्यांत अर्थ आहे ? ( *एकदम* ) तुला एक टोस्ट कापून देऊं का ? मघांशीं कांहींच खाल्लंस नाहीं तूं – एक टोस्ट देतें नी त्यावर एक केळं खा – चांगलीं केळीं घेतलींत मी सकाळीं – आणि स्वस्थ झोंपून जा बघूं –

अमृतः– पण आतां करायचं काय ? समज, आतांच पोलीस आले झडती घ्यायला तर ?

मिरा:—(*टोस्ट, केळीं, सुरी वगैरे टेबलावर घेत*) इतकी चपळाई पोलीस दाखवतील तर पहायलाच नको – जगांत फारच थोडे गुन्हे होतील – उगाच काय कांहीं तरी डोक्यांत घेऊन बसलायस् ? रात्रीं चांगली झोंप लागली म्हणजे उद्यां सकाळीं कांहीं वाटणार नाहीं तुला – घरांत थोडं ओव्हलटिन आहे – टोस्टबरोबर ओव्हलटिन पाहिजे का ?

अमृत:— मला कांहीं नको ग खायला –

मिरा:— जणुं काय तूं खरोखरच खून केलायस् असा वागतोयस् तूं, अमृत. इतका भित्रा असशील तूं, असं मला वाटलं नव्हतं.

अमृत:– भीतीचा प्रश्नच नाहीं ग – (*एक एक शब्द मोजून*) माझी सदसद्विवेकबुद्धि मला चैन पडूं देत नाहीं.

मिरा:— म्हणजे – तूं – ?

अमृत:— हो; खरं आहे तें –

मिरा:— काय ?

अमृत: — खरोखरच सुंदरलालचा कांटा माझ्या मनांत सारखा सलत असे – तो माझ्याशीं फारच गोड वागायचा प्रयत्न करायचा-- संप कमिटीचा अध्यक्ष म्हणून त्याची माझी मागें नेहमीं गांठ पडायची - पण तो जितका अधिक गोडवा दाखवण्याचा प्रयत्न करी तितका त्याचा मला अधिकच तिरस्कार वाटे – मला तो सदासर्वदा खेळवण्याचा प्रयत्न करतो आहे असा मला भास होई – या मूर्ख पोराचे सर्व डाव मला माहीत आहेत असं कांहींतरी त्याच्या डोळ्यांत दिसे. त्याचा खून करण्याचा विचार माझ्या डोक्यांत कधींच आला नाहीं--पण त्याचा जर खून झाला तर कांहीं वाईट नाहीं, असं मला नेहमीं वाटे -- आणि आतां खरोखरच —

मिरा: — खरोखरच काय ?

अमृत:— आणखी काय सांगायचं ? एवढं कसं तुला समजत नाहीं ?– सदासर्वदा त्याच्या खुनाचे विचार माझ्या डोक्यांत घोळा-यचे नी आतां त्याचा खरोखरच खून पडलाय – जणुं काय मीच– माझ्या विचारांनींच त्याचा खून केला असं माझी सदसद्विवेकबुद्धि

मला पुन्हां पुन्हां टोंचून सांगते – एकंदर ज्या परिस्थितींत खून झालाय् तिच्यामुळें इतरांना तर मी खुनी आहे असं वाटेलच–पण – पण माझं मनच जिथं मला खातंय, तिथं मी निर्दोष आहें हें मी स्वतः तरी कसं सिद्ध करूं ?

मिराः– काय वेड्यासारखं बरळतोयस् तूं, अमृत? तूं दोषी आहेस हें सिद्ध करण्याची जबाबदारी पोलिसांवर आहे – तूं निर्दोष आहेस हें सिद्ध करायला तूं बांधलेला नाहींस !

अमृतः– तें सगळं माहीत आहे ग, मला. पुरेसा पुरावा नाहीं पुढच्यावर निर्दोषी म्हणून एखादे वेळीं सुटेनही; पण सर्व जगाला काय वाटेल ?– मी खुनी आहें हा शिक्का माझ्या डोक्यावर राहणारच.

मिराः– कसला शिक्का घेऊन बसलाहेस ? निर्दोषी म्हणजे निर्दोषी.

अमृतः– त्या कागदोपत्रीं असलेल्या शब्दांचा कांहीं उपयोग नाहीं, ग – माझ्यावर कुणी विश्वास ठेवणार नाहीं – देहांत शिक्षेविरुद्ध मी आजपर्यंत इतके वेळां बोललोंय ना ? – पण यानंतर पुन्हां जर मी त्या विषयावर तोंड उघडलं तर लोक म्हणतील, 'आहे माहीत मोठा भूतदयेचा पुतळा ! स्वतःची मान बचावण्यासाठीं जगाच्या कल्याणाचं ब्रह्मज्ञान सांगतोय !'

मिराः– जसं कांहीं सर्व होऊन गेल्यासारखं काय करतोयस, अमृत ?– इतकं निराश होण्यासारखं कांहींच झालेलं नाहीं –

अमृतः– नाहीं ?

मिराः— नाहीं तर काय ? बैठक संपवून तूं केव्हां बाहेर पडलास तें तुझे सर्व मित्र सांगू शकतील. इथं तूं किती वाजतां येऊन पोहोंचलास तें मी सांगूं शकेन. ही वेळ सिद्ध झाली कीं सभा आटोपून तूं सरळ घरीं आलास हें आपोआपच सिद्ध होतं. बाबांचं मॉसर पिस्तूल माझ्या ट्रंकेंत जसंच्या तसं पडलेलं आहे, हें मी शपथेवर सांगेन –

अमृतः– तुझ्या सांगण्याचा कांहीं उपयोग नाहीं – आरोपीच्या बायकोच्या शब्दांवर कुठलं कोर्ट विश्वास ठेवील ? इतक्या वेळांत मी घरीं परत आलों यावरून मी सरळ घरीं परत आलों हें कसं काय

सिद्ध होणार? पिस्तूल झाडायला अर्धं मिनिटसुद्धां लागणार नाहीं— छेः ! मला विचार करून कांहीं तरी मुद्दे शोधून काढलेच पाहिजेत— (*रेडिओकडे पहात*) रेडिओवर कशी सांगितली बातमी ती? बरोबर शब्द आठवतात तुला?

मिराः— विखरोळी — घाटकोपरमधील जंगलांतल्या एका आडवाटेवर सुंदरलाल बाजपेयी यांचा खून झालेला आढळला.

अमृतः— आणखी ?

मिराः— खुनी माणसानं अगदीं जवळून पिस्तूल झाडलं असावं, असा पोलिसांचा अंदाज आहे— आणि — हो, हें फार महत्त्वाचं आहे. त्यांच्या खिशांतील पैशाचें पाकीट आणि बोटांतली हिऱ्याची आंगठी नाहींशी झाली आहे.

अमृतः— माझ्या दृष्टीनं हें फार महत्त्वाचं आहे. मी कांहीं चोर नाहीं. अगदीं जवळून मी जर पिस्तूल झाडलं असतं आणि खिशांत हात घालून पैशाच पाकीट किंवा बोटांतली हिऱ्याची आंगठी काढून घेतली असती तर माझ्या अंगावर हवा तेवढा महत्त्वाचा पुरावा सांपडला असता —

मिराः— कसला पुरावा ?

अमृतः— माझ्या कपड्यांना कुठंतरी रक्त नसतं का लागलं ? काळोखांत घाईघाईनं गोळी लागून पडलेल्या माणसाच्या अंगावरचा ऐवज ओरबाडून घेतांना खुनी माणसाच्या कपड्यांना कुठं ना कुठंतरी रक्त नाहीं का लागणार ? ( *खुंटीवरचा आपला कोट काढून आणतो — स्वतःच्या शर्ट — पँटकडे पहात* ) हें पहा, माझ्या कपड्यांवर कुठं कांहीं नाहीं. हा कांहीं फारसा मोठा पुरावा नाहीं. तरीपण त्यांतल्या त्यांत—

मिराः— झालं ना आतां समाधान तुझं ? मी नाहीं तुला सांगितलं मघांशींच ? आतां रात्रीं चांगली झोंप लागली कीं, उद्यां सकाळीं कांहींच वाटणार नाहीं तुला. ( *उठते* ) आतां मात्र टोस्ट नी केळं खाल्लंच पाहिजे हं. आतां मी कांहीं ऐकणार नाहीं तुझं.

अमृतः— बरं, बरं — मात्र तूं सुद्धां कांहीं तरी खाल्लं पाहिजेस हं—

मिराः— (*सुरी घेऊन टोस्ट कापायची तयारी करते.*) निवळलं म्हणायचं

डोकं तुझं ? ( *लोणी लावते आणि सुरीनें तुकडे करूं लागते. सुरी सरकून तिचें बोट कापतें.*) आई ग !

अमृत:– बोट कापलं कीं काय ?

मिरा:– फार नाहीं – थोडंसं रक्त आलंय्. (*तोंडांत घालून बोट चाखूं लागते.*) माझ्या बॅगमधला मळका रुमाल – ( *ती स्वत: एका हातानें बॅग जवळ घेऊन पहाते.*)

अमृत:– मी देतों ना काढून. ( *तिची मनीबॅग उघडतो. तिचा हातरुमाल बाहेर काढतो. हातरुमालावर त्याला कांहीं रक्ताचे डाग दिसतात*) हें ग काय ? दुपारीं आणखी बोट कापलं होतं कीं काय तुझं ?

मिरा:– नाहीं – कां ?

अमृत:– (*रुमाल दाखवीत*) या रुमालावर कितीतरी रक्ताचे डाग आहेत.

मिरा:– (*गोंधळते. त्याच्या हातांतून पट्‌कन रुमाल काढून घेते.*) काय ? डाग ? – हं – हो. दुपारीं माझ्या नाकांतून थोडं रक्त आलं होतं. ( *रुमाल बाजूला टाकते.* )

अमृत:– मला सांगितलंस नाहीं तें मी आल्याबरोबर ?

मिरा:– त्यांत काय सांगायचं ? थोडंसं नाकांतून रक्त आलं.

अमृत:– यापूर्वीं तुझ्या नाकांतून कधीं रक्त आलं नव्हतं. (*आपल्या खिशांतला रुमाल काढीत* ) हा घे माझा रुमाल.

मिरा:– नको – नको– आतां कांहीं फार नाहीं येत रक्त.

अमृत:– तुला कांहीं होत नाहीं ना, मिरा ? नाकांतून रक्त कसं आलं ?

मिरा:– मला कांहीं होत नाहीं – उगाच काय घाबरून जातोस ? जरा जोरानं शिंकरलं म्हणून थोडंसं रक्त आलं इतकंच – माझ्या पातळावरही थोडंसं उडालंय. ( *अमृत तिच्या पातळाकडे पहातो* ) या पातळावर नाहीं रे – तें पातळ बदलून टाकलं मीं.

अमृत:– (*विचार करीत*) आज तूं कुठं बाहेर गेली होतीस ?

मिरा:– मी ? बाहेर ? छे: ! नाहीं – हो. दुपारीं बाजारांत गेलें होतें एकदां – कां ?

अमृत:– नाहीं –सहज विचारलं – तुझी प्रकृति नीट दिसत नाहीं – उगाच उन्हातान्हांत तूं मुळींच जाऊं नकोस. मला सांग तुला काय हवं असेल तें – मी घेऊन येत जाईन संध्याकाळीं–

मिरा:– या चिंधीची जरा गांठ मारना.

अमृत:– मग सांगत कां नाहींस ( *गांठ मारूं लागतो. ती त्याच्या कपाळाचा मुका घेते.* ) ( *जिन्यावर पावलें वाजतात. दोघेंही श्वास धरून ऐकत उभीं राहातात.* )

अमृत:– (*आंतल्या आवाजांत* ) कोण ग?

मिरा:– (हळू) तूं चूप रहा –(*खिडकीच्या कांचेवर दाराकडे येणारी आकृति दिसते. दरवाजावर खट् खट् आवाज होतो. मिरा दरवाजा उघडा-वयाला पुढें सरते.* )

अमृत:– ( *तिचा दंड धरून* ) तूं नको पुढं जाऊं. ( *पुन्हां दारावर आवाज होतो.* )

आवाज:– अहो मिस्टर जाधव – जाधव इथंच रहातात काय?

अमृत:– मिरा, उघड.

मिरा:– ( *खुणेनें त्याला तूं बोलूं नकोस म्हणून सांगते.* ) कोण आहे ?

आवाज:– दार उघडा ना.

मिरा:– मि. जाधव बाहेर गेलेत – मी कपडे बदलतेंय. जरा थांबा हं.

आवाज:– नको – नको -- मी चिठ्ठी वरून टाकतों. मला नुसती चिठ्ठी द्यायलाच सांगितलंय—

मिरा:– ( *आंतून* ) बरं – बरं –

( *चिठ्ठी आंत पडते – जाणाऱ्या पावलाचे आवाज ऐकूं येतात.* ) ही कसली चिठ्ठी ?

अमृत:– वाच ना उघडून – अशी कांपतेस काय ?

मिरा:– ही घे. तूंच वाच.

अमृत:– ( *वाचतो – हंसतो* ) हात्तीच्या ! आपल्या कॉमरेड अण्णे-गिरीची चिठ्ठी आहे. वखारींतल्या पोराबरोबर पाठवलीन्. त्याला अगदीं आतां रहावत नाहीं. ‘उद्यां सकाळीं तूं दादरच्या जागेत

सामान हालवशीलच. मी दुपारीं माझं सामान घेऊन येतों.' हें सांगायला लेकानं रात्रीं या वेळीं चिठ्ठी पाठवलीन् !—

मिरा:– ( *सुटकेचा श्वास सोडून* ) खरंच – उद्यां एकदां आपण दादरला रहायला गेलों कीं सुटलों सर्व काळजींतून—

अमृत:– ( *हंसत* ) सर्व काळजींतून सुटायला अजून पुष्कळ वेळ आहे.

मिरा:– म्हणजे ? उद्यां आपण जायचंच ना दादरला ?

अमृत:– अग, त्या अण्णेगिरीचं काय – राहील वखारीत आणखी दोन दिवस – नाकडोळे चांगले साफ होताहेत त्याचे नी त्याच्या पोरीचे ! आपण जाऊं दोन दिवसांनीं.

मिरा:– असं काय रे ? मघांशीच तूं कबूल केलंयस् उद्यां जायचं म्हणून. तें कांहीं नाहीं. उद्यां जायचं – मला आतां एक मिनिटभरसुद्धां इथं रहावत नाहीं. पाहिजे तर आतां सामान हालवायला मी तयार आहें.

अमृत:– अग हो – हो – इतकी काय अगदीं घोड्यावर बसली आहेस दादरला जायला ? जाऊं या ना उद्यां – इतका एकदम या जागेचा वैताग यायला काय झालं ? उद्यांच जाऊ या. बिचारा अण्णेगिरीही खूष होईल – कुठं आहे तुझा टोस्ट नी केळीं ? चांगलीच भूक लागलीय्.

मिरा:– हा घे – आणि म्हटलं आतां पड जाऊन आंत.

अमृत:– हो – हो – आधीं खाऊन संपवतों, कपडे बदलतों – पायजमा चढवतों – नी मग झोंपतों. असं लहान पोरासारखं काय करतोस मला ?

मिरा:— नाहीं रे मला सगळं आवरायचंय अजून. खरंच तुला ओव्हेलटिन पाहिजे का ?

अमृत:–दे ना.

मिरा:–तोंपर्यंत तूं कपडे बदलून टाक आंत. (*तो टोस्ट खात खात पडद्यामागें जातो. ती स्टोव्ह पेटवून ओव्हलटिन ढवळूं लागते. पेल्यांत ओतून त्याला आंत नेऊन देते...स्टोव्ह पेटतोच आहे. परत येऊन अस्ताव्यस्त*

*पडलेले कपडे आवरूं लागते. त्याचा बिछान्यावर पडलेला कोट उचलून खुंटीला लावायला जाते. एक बटन सैल होऊन लोंबतें आहे. तें ती निरखून पहातें आहे. अमृत बाहेर येतो. तिची त्याच्याकडे पाठ आहे. तो पायजम्यांत आहे केळें खात खात तो बोलतो.)*

अमृतः– काय, फिटला संशय ?

मिराः– (*दचकते. कोट खालीं पडतो तो वर उचलून*) नाहीं – रे – तुझ्या कोटाचं एक बटन अगदीं तुटायला आलंय.

अमृतः– (*पहात*) असं होय ? (*आजूबाजूला पहातो. रक्ताचे डाग असलेला तिचा रुमाल खालीं पडला आहे*) अग, हा रक्तानं भरलेला रुमाल कुठं तरी मोरींत नेऊन टाक.

मिराः– तूं जा आंत. मला आवरूं दे सर्व.

अमृतः— अच्छा. (*तो आंत जातो.*)

(*मिरा तो रुमाल उचलून घेते. त्याच्याकडे तिरस्कारानें पहात त्याचा चोळामोळा करते आणि पेटत्या स्टोव्हवर तो टाकते. भराभर सर्व आवरून ती दिवा मालवते. ती आंत जाऊं लागते तसा—*

(पडदा हळूहळू खालीं येतो.)

## फांस

## अंक दुसरा

*[स्थळ:– दादर विभागांतला दुसऱ्या मजल्यावरील तीन खोल्यांचा ब्लॉक. वेळ :– संध्याकाळची ]*

मिरा:– ( *आंतून एक पुस्तकांचें गांठोडें आणून सोडते आणि पुस्तकें कपाटांत लावूं लागते.*) कुणाचं रे पत्र, अमृत ?

अमृत:— विशेष कांहीं नाहीं.

मिरा:— आतांच पोस्टमन येऊन गेला वाटतं ?- माझं आहे का एखादं पत्र ?

अमृत:– नाहीं.

मिरा:– (*आजूबाजूला पहात*) कित्ती बरं वाटतं इथं ! छान आहे, नाहीं ?

अमृत:– काय ?

मिरा:— कित्ती बरं वाटतं आपल्या या नव्या जागेंत ! आपली ही नवी जागा - फारच छान आहे, नाहीं ? एका एका खोलींत पांच पांच मिनिटं उभी राहून मी नुसती पहातच राहतें इकडे तिकडे -

वर, भिंतीकडे – (*अमृत हंसतो*) खरंच – किती मोकळं मोकळं वाटतं ! – सुटलें एकदांची असं वाटतं –

अमृत:- (*तिच्याकडे निरखून पहात*) कमींत कमी दहादां तरी हे शब्द तूं ऐकवले असशील मला – कशांतून सुटल्यासारखं वाटतं ? – जुन्या जागेंत असतांना कसल्या एवढ्या संकटांत सांपडली होतीस ? (*मिरा उत्तर देत नाहीं.*) इतकी कांहीं आपली ती जागा वाईट नव्हती. चाळींतली जागा होती हें खरं; पण आपण तिथं कितीतरी वर्षं चांगलीं मजेत काढलीं.

मिरा:– (*जमिनीवर पडलेल्या पुस्तकांच्या ढिगांतून पुस्तक उचलीत*) तसं नव्हे रे. पण इथं मला फारच मोकळं वाटतं.

अमृत:– (*हंसत*) कां ? घाटकोपरच्या जागेंत सुंदरलालचं भूत येईल असं वाटत होतं की काय तुला ?

मिरा:— (*दचकून*) कांहीं तरीच बोलूं नकोस, अमृत !

अमृत:– कांहीं तरीच काय ?

मिरा:— कांहीं तरीच नाहीं तर काय ? उगाच काय एखाद्याला घाबरवतोस ?

अमृत:– घाबरायला काय झालं तुला ? काय – काय. तिथं तो भयंकर झालेला खून – तो पोलीस तपास – नी त्या भानगडी –

मिरा:– तसं नाहीं रे – पण आज अगदीं दमून गेलेय् मी हें सामान लावतां लावतां; नी तूं आपला वाटेल तशी थट्टा करतोस माझी !

अमृत:– बरं – बरं – आय ॲम् सॉरी – हं. बाकी जागा बदलायची म्हणजे तें एक संकटच असतं.

अमृत:– आपल्याला काय करायचंय त्या खुनाच्या भानगडीशीं ! माझ्याविरुद्ध तसा कांहींच पुरावा सांपडण्यासारखा नाहीं. माझ्या कपड्यांवर रक्ताचा एखादा शितोडाही नाहीं कुठं. (*हंसत*) मात्र तुझ्या रुमालावर नी पातळावर (*हंसतो. तिचा पांढरा फटक पडलेला चेहेरा पाहून एकदम थांबतो.*) मिरा – मिरा – हें काय – काय ग ? काय झालं ?

मिरा:– कांही नाही. (*तोंड फिरवते*) कांहीं नाहीं – तुला कांहीं

खायला पाहिजे का चहाबरोबर ? करूं कांहीं तरी ? ( *स्वयंपाक-घरांत जाते. अमृत शेवटचें पत्र उघडतो आणि वाचूं लागतो. वाचतां वाचतां दचकतो. एकदम खालची सही पाहातो आणि पुन्हां पहिल्यापासून वाचतो.* )

अमृतः— मिरा – ए मिरा !

मिराः— ( *आंतून* ) ओ – आले. ( *बाहेर येऊन* ) काय ?

अमृतः – हें पाहृयलंस – पार्टीच्या चेअरमनचं पत्र.

मिराः– काय झालं – काय आहे पत्रांत ?

अमृत–( *वाचूं लागतो* ) " जिकडे तिकडे अशी दाट अफवा आहे की सुंदरलाल बाजपेयींच्या खुनामागें कांहींतरी राजकीय हेतु आहे – संप व्हायचं घाटत असतांनाच हा खून झाला – त्यामुळें तर सर्व-सामान्य लोकांचा नक्कीच असा समज आहे. . . "

मिराः– अं ! कांहीं तरीच. सुंदरलालच्या हातांतली अगठी नी खिशांतले पैसे नाहींसे झाले होते ना ?–मग खात्रीनें चोरीसाठींच खून झाला आहे. राजकीय हेतु कसा असेल तिथं ?

अमृतः– काय सांगावं ?

मिराः– आपल्या पार्टींतल्याच माणसांना तसं वाटतंय कीं खरोखरच पोलिसांना तसा संशय येतोय् ?

अमृतः– ( *पत्र पहात* ) पार्टीचा कुणावर तरी संशय आहे असं दिसतं –

मिराः— आपल्या पार्टींतल्याच माणसावर ?

अमृतः— आपल्या पार्टींतल्या माणसावर नव्हे; पण राजकीय चळ-वळींतल्याच कुणावर तरी.

मिराः– आपल्या पार्टींतल्या माणसावर नाहीं ना ? मग झालं तर.

अमृतः– तुम्हां बायकांची कमाल आहे बुवा ! खुनी माणसाचा ताबडतोब तलास लावून त्याला फांशी दिला पाहिजे असं तूंच काल तावातावानें म्हणत होतीस – नी आतां तुला कशाचंच कांहीं वाटत नाहीं !

मिराः– मला कांहीं वाटायची जरूर काय ? खुनी माणूस आपल्या

पार्टीतला नाहीं ना? मग जाऊं द्या – त्याला फांशी. आपल्याला काय करायचंय् ?

अमृत:– ( *संतापून* ) हेंच तें. निदान तूं तरी असं म्हणतां कामा नये, मिरा. फांशीच्या मी किती विरुद्ध आहें हें तुला माहीत आहे. फांशी म्हणजे एका खुनाचा बदला दुसऱ्या खुनानं घेण्यासारखं आहे. शुद्ध रानटीपणा आहे तो! फांशीची शिक्षा अजूनही कायम ठेवायला विसाव्या शतकांतल्या सुधारलेल्या माणसांना स्वतःची शरम वाटली पाहिजे.

मिरा:– पण केव्हा केव्हां फांशी जाणाऱ्या माणसाला जिवंत राहाण्यापेक्षां फांशी जाणंच बरं वाटत असेल तर?

अमृत:– शट् अप मिरा! मला उगीच चिडवू नकोस. या प्रश्नाबाबत माझी मतं किती कडक आहेत याची तुला पूर्ण कल्पना आहे.

मिरा:– उगाच काय चिडतोस, अमृत? बाजारांत तुरी नी भट भटणीला मारी – तसाच प्रकार होतोय् हा थोडासा – खुनी माणसाचा अजून कुणालाच पत्ता नाहीं नी त्याला फांशी द्यावा कीं काळ्यापाण्यावर पाठवावा याबद्दल तुझं नी माझं भांडण जुंपलंय्! (*भिंतीवर चित्र लावून पहाते.*) अरे हो, आज दुपारची गंमत तुला सांगायला विसरलेंच. आपली घाटकोपरची सखी धोबीण बरोबर पत्ता काढीत आली इथं दुपारीं – दादरलाही तिची गिऱ्हाइकं आहेत म्हणे – या बह्रिरीपुढं घसाफोड करायच्या त्रासांतून मी सुटलें असं वाटत होतं; पण माझ्या नशिबी तें दिसत नाहीं! ( *आपल्याच विचारांच्या तंद्रींत अमृत समोर पहातो आहे.* ) कसला एवढा विचार करतोयस्, अमृत?

अमृत:– काय म्हणालीस? सखी धोबीण आली होती होय दुपारीं? वा:! छान!

मिरा:– कोपऱ्यांत पडलेले सगळे मळके कपडे म्हातारीनं गुंडाळून नेले जातांना –

अमृत:– मग काय झालं त्यांत?

मिरा:– कांहीं फाटके कपडे मला धुवायला द्यायचे नव्हते. तेही

नेलेन् ! – बराच वेळ बसली होती गप्पा मारीत. तिला पण आपली नवी जागा फार आवडली. *( अमृतचें तिच्या बोलण्याकडे लक्ष नाहीं. तो मधून मधून हातांतल्या पत्राकडे पहातो आहे. )*

अमृतः– आमच्या चेअरमनच्या या पत्राचा एकंदर सूर मला मुळींच आवडला नाहीं.

मिराः– म्हणजे ? आहे काय सूर ?

अमृतः– ( *तिच्याकडे क्षणभर टक लावून पहात* ) मिरा, तुझ्या नाकां-तून अलिकडे केव्हां केव्हां रक्त येतें हें मी काल घरीं आल्याबरोबर तूं मला कां नाही सांगितलंस ?

मिराः– त्यांत काय सांगायचं ? *( किंचित् थांबून, गंभीरपणें )* आत्तांच हा प्रश्न विचारायचं कारण काय ?– तुला म्हणायचंय तरी काय, अमृत ?

अमृतः- पूर्वी तूं सर्व कांहीं मला सांगत होतीस –

मिराः– होय ? *( थट्टेच्या स्वरांत )* खरंच. तूं दमून भागून संध्याकाळीं घरीं यायचास नी मी माझ्या डोळ्यांत केर कसा गेला नी उशीत ढेकूण किती सांपडले या गोष्टी सांगून तुझं डोकं उठवायची; होय ना ? केव्हां केव्हां कित्ती चिडायचास तूं !

अमृतः– मुळींच चिडत नव्हतों मी – मला तेंच फार आवडायचं. ( *उठून उभा राहत* ) तूं सर्व कांहीं मला सांगावंस, असंच मला वाटतं.

मिराः– बारीकसारीक गोष्टीसुद्धां ?

अमृतः– हो. बारीकसारीक गोष्टीसुद्धां – नवरा-बायकोच्या प्रेमांत बरेच वेळां बारीकसारीक गोष्टीच फार महत्त्वाच्या असतात.

मिराः– उगाच एवढं तेवढं सांगून तुला काय त्रास द्यायचा ?

अमृतः– मला नाहीं त्याचा त्रास वाटत; उलट तुझ्या लपवा-छपवीमुळं मला अधिक त्रास होतो.

मिरा– लपवाछपवी ?

अमृतः– हो. लपवाछपवी.

मिराः– तुझ्या बोलण्याचा मला अर्थच कळत नाहीं.

अमृतः– सर्व कांहीं कळतंय्. या क्षणाला माझ्यापासून कांहींतरी छपवण्याचा तूं प्रयत्न करते आहेस, मिरा.

मिराः– असं काय रे, अमृत ? माझ्या बारीकसारीक तक्रारी तुला सांगून – तुला आणखी त्रास कशाला द्यायचा ?

अमृतः– हेंच तें !

मिराः– पार्टीच्या त्या पत्रांतला मजकूर तूं सांगितल्यापासून--

अमृतः– मजकूर सांगितल्यापासून काय ?

मिराः–मला एकदम धक्काच बसलाय.

अमृतः– कसला ?

मिराः– ( *चांचरत* ) या खुनाच्या मागं राजकीय हेतु आहे, असं जर आपल्याच पार्टीला वाटतं, तर—

अमृतः– तर काय ?

मिराः– तर दुसरं आणखी काय ? सुंदरलाल बाजपेयीचा नंबर एकचा – जगजाहीर असा – जर कुणी हाडवैरी असेल तर तो तूं. पोलिसांनाही या गोष्टीची कल्पना नसेल असं म्हणवत नाहीं.

अमृतः– म्हणजे – पोलिसांनाही माझा संशय आल्याशिवाय रहाणार नाहीं, असंच तुला म्हणायचंय; होय ना ?

मिराः– होय.

अमृतः– ( *प्रक्षुब्ध आवाजांत* ) पण त्यांच्याकडे पुरावा कुठं आहे ? प्रत्यक्ष पुरावा तर कांहींच नाहीं. पार्टीला कांहीं वाटो – ( *तो एकदम थांबतो.* )

मिराः– काय ? पार्टीला काय ? ( *अमृत उत्तर देत नाहीं. त्याच्या पुढ्यांतलं पार्टीचं पत्र ती उचलते.* ) पाहूं दे पत्रांत काय आहे तें.

अमृतः– ( *तिच्या हातांतलें पत्र काढून घेत* ) कांहीं नाहीं विशेष त्या पत्रांत. पार्टी कांहीं का म्हणेना ! ( *पत्र खिशांत कोंबतो. स्वतःला शांत करण्याचा प्रयत्न करतो.* ) मिरा, निदान तुझा तरी माझ्यावर खास विश्वास आहे ? मी कुणाचा खून करणं शक्य नाहीं याची तुला तरी शंका नाहीं ना ?

मिराः– (*कोचावर बसत*) निदान तुझीं मतं तरी तशीं आहेत, यांत मुळींच शंका नाहीं.

अमृतः– म्हणजे ? माझीं मतं तशीं असलीं तरी कृतींत कदाचित् मी तसा वागणार नाहीं, असं वाटतं तुला ?

मिराः– मीं तसं म्हटलं का ? उगाच काय, अमृत ?

अमृतः– तुझ्या बोलण्याचा सूर मला तसा वाटला – (*किंचित् थांबून*) सुंदरलालचा नी माझा उभा दावा होता हें तर जगाजाहीरच आहे. पण आमच्या पक्षांतल्या कुणालाच तो आवडत नव्हता– आवडणं शक्यच नव्हतं – माझाच कां ? आमच्या सबंध पार्टीचा नी त्याचा उभा दावा होता. त्याला कारणंही तशींच होती. भांडवलवाले पुष्कळ आहेत; पण सुंदरलाल म्हणजे कांहीं वेगळंच प्रकरण होतं. काय त्याच्याकडे जादू होती कुणाला ठाऊक; आमच्या पार्टीचं एकही गुपीत त्याला कळल्याशिवाय रहात नसे. कितीही गुप्तपणें कांहीं ठरवा, त्याला सर्व कांहीं इत्थंभूत आगोदरच कळायचं. संप केव्हां होणार हें आमच्या पार्टीच्या सर्व सभासदांना कळायच्या आधीं याला त्याची सर्व बातमी ! महाबदमाष होता लेकाचा ! (*किंचित् थांबून*) तुला आठवतं ? एकदां कोटांतल्या एका हॉटेलांत अमेरिकेहून आलेल्या कॉमरेडला तूं, मी आणि पटेल अगदीं गुप्तपणें भेटायला जायचं ठरवलं होतं. पूर्वी मी कधीं पाहृयलंही नव्हतं तें हॉटेल — कांहीं तरी चमत्कारिक नांव आहे पहा त्या हॉटेलचं–

मिराः– हॉटेल् कोनेमारा –

अमृतः– हं – हं – कोनेमारा. त्या रात्रीं तिथं आपण जाणार हें आपणां तिघांखेरीज कुणालाही माहीत नव्हतं. पण बरोबर त्या रात्रीं पोलिसांनीं तिथं धाड घातली – सुदैवानं काम लवकर आटोपल्यामुळं आपण आठलाच बाहेर पडलों नी धाड नऊ वाजतां पडली.

मिराः– मला वाटतं, बोलाफुलाला गांठ पडली त्या वेळेला, इतकंच.

अमृतः– कसली आली आहे बोलाफुलाला गांठ ! बरोबर चोव्वीस तास आधीं त्या बदमाषाला आपण तिथं जाणार हें कळलं होतं.

आदल्या दिवशींच त्यानं टेलिफोन करून पोलिसांना बातमी दिली होती – हें त्याच्याच ऑफिसांतल्या एका माणसानं मला नंतर सांगितलं.

मिरा:– तसंही असेल कदाचित्. आपण दुसरं कांहीं तरी बोलूं. मला वीट आलाय् सुंदरलालच्या या गोष्टीचा – कुणी तरी त्याला गोळी घातली - मेला – गेला – झालं एकदाचं. सुटलों आपण सर्व. मला तर त्याचं नांवही काढूं नयेसं वाटतं. ( *उठून सैंपाकघरांत जाऊं लागते.* )

अमृत:– खरंच. नाहीं नाहीं म्हणत पुन्हां पुन्हां आपण त्याच्याच गोष्टी बोलतों. मलाही कंटाळा आलाय् अगदीं – काय ग, चहाबरोबर कांहीं तरी खायला करणार होतीस ना ?

मिरा:– मग करतें ना. दुपारींच सर्व तयारी करून ठेवली आहे मीं – आपल्या नव्या जागेची आज वास्तुशांति करायची ! तुला पार्टी देणार आहें मी !

अमृत:– कसली बुवा पार्टी ?

मिरा:– तुला अगदीं फार फार आवडतो तो आमचा नागपुरी पदार्थ केलाय्.

अमृत:– काय बुवा ?

मिरा:– पूड !

अमृत:– अरे बापरे ! चहा बरोबर पूड ? म्हणजे आज रात्रीं जेवायलाच नको ! बरं – बरं. काय असेल तें आण लवकर. मला अश्शी भूक लागली आहे सांगूं ! ( *कसला तरी आवाज अमृतच्या कानांवर येतो तो हलकेच उठून चोरट्या पावलांनीं दरवाजाकडे जातो. दरवाजावरल्या व्हेंटिलेटरमधून एक वर्तमानपत्र आंत पडतें. तो तें उचलून घेतो आहे इतक्यांत मिरा खायचे पदार्थ आणि चहाचें सामान घेऊन येते.* )

मिरा:– काय रे तें ?

अमृत:– संध्याकाळचं पत्र आहे तें.

मिरा:– इथं कुठून उत्पन्न झालं एकदम ?

अमृत:– मींच एका पोऱ्याला सांगितलंय् रोज संध्याकाळीं टाकायला. (*उघडून पाहूं लागतो.*)

मिरा:– (*टेबलावर चहाचें सामान ठेवीत*) ओ हो ! अमृत, आपण हळूहळू शिष्ट होऊं लागलों !

अमृत:– म्हणजे ?

मिरा:– रहायला ब्लॉक् – टेलिफोन – रोज सकाळ संध्याकाळ पोऱ्या पेपर टाकणार – !

अमृत:– माझी थट्टा करतेस; होय ?

मिरा:– थट्टा कसली ? खरंच सांगतेंय् – बरं तें राहूं दे. चहा निवून जाईल. तू खायला लाग बघू – (*अमृत वर्तमानपत्रांतच गर्क आहे.*) आतां पुरे झालं तें वर्तमानपत्राचं वाचन. निदान चहा घेतांना तरी राजकारणाशिवाय दुसरं कांहीं तरी बोलूं या.

अमृत:— अग, मी बातम्या वाचीत नाहीं. रेडिओचा आत्तां काय कार्यक्रम आहे तो पहातोंय्.

मिरा:– (*चहा तयार करीत*) मग तिथं मधल्या पानावर काय पहातोय्स – शेवटल्या पानावर पहा.

अमृत:– अरे हो ! – माझ्या लक्षांतच राहात नाहीं. (*शेवटचें पान पाहूं लागतो.*)

मिरा:– मला वाटतं, रेडिओवरल्या बातम्यांची वेळ होऊन गेली असेल.

अमृत:– कसली बातमी पाहिजे तुला ? (*तिच्याकडे क्षणार्ध पहातो. नंतर वर्तमानपत्राकडे दृष्टि वळवून*) आज रात्रीं संगीताचा कांहीं चांगला कार्यक्रम आहे का पहातोंय्–

मिरा:– मग सगळं कांहीं पहा – आधीं खायला सुरवात कर बघूं.

अमृत:– अं – हं – (*वर्तमानपत्र बाजला टाकीत*) झकास आहे तुझं पूड ! (*खातो.*) चांगलेच झालेत ग –

मिरा:– मग ?' केले कुणी ? (*बाजूला पडलेल्या वर्तमानपत्राकडेच अमृतचें लक्ष आहे.*) आज तूं गप्प गप्प कां ?

अमृतः– (*खात*) एका तोंडानं करूं तरी काय ? खाऊं कीं बोलूं ? (*दोनतीन क्षण स्तब्धतेंत जातात.*)

मिराः— नव्या घरांतला आजचा आपला पहिला दिवस आहे–

अमृतः– हूं.

मिराः– आजच्या मुहूर्तावर आपण अगदीं नवीन आयुष्याला–

अमृतः– (*एकदम चिडून*) पुरे कर तुझी वटवट, मिरा.

मिराः– काय, झालंय काय तुला, अमृत ?

अमृतः– आय् ॲम् सॉरी, मिरा. मला आज अगदीं कसंसंच वाटतंय. मुळींच बरं वाटत नाहीं –

मिराः– काय होतंय ?

अमृतः– तसं कांहीं नाहीं ग, – मला वाटतं, नवीन जागेंत आल्यामुळं जरा कसंसंच चमत्कारिक वाटत असावं –

मिराः– हें आपलं कांहीं तरीच हं.

अमृतः– काय कुणाला ठाऊक, पण या जागेंत आपल्यावर कांहीं तरी संकट येणार, असं मला सारखं वाटतं –

मिराः– उगाच काय; काय म्हणून संकट येईल ?

अमृतः– सारखं राहून राहून मला असं वाटतंय् खरं ! (*शून्य दृष्टीनें तो समोर पहातो. ती त्याच्या तोंडाकडे टक लावून पहाते.*)' मला कशानं तरी झपाटलंय् ! (*उठून इकडे तिकडे फिरतो.*)

मिराः– काय ?

अमृतः– माझ्या मानगुटीवर त्याचं भूत बसलंय् –

मिराः– कुणाचं ?

अमृतः–(*ओरडून*) त्या सुंदरलालचं ! (*जणुं काय समोर कांहीं तरी दिसतेंय अशा तऱ्हेनें पहातो.*) कालपासून सारखा बघतोंय् मी – दुसरा विचारच येत नाहीं डोक्यांत. कित्ती विसरण्याचा प्रयत्न केला तरी पुन्हां जिथं तिथं – कांहीं करण्याचा प्रयत्न केला तरी त्याचा विचार कांहीं माझा पिच्छा सोडीत नाहीं – अमका समंध होऊन अमक्याच्या उरावर बसला, असल्या गोष्टी भोळसट लोक सांगतात तो हाच तर प्रकार नसेल ना ? (*किंचित् थांबून, शांतपणें*) मला

वाटतं आम्ही दोघं एकमेकांचा इतका आत्यंतिक द्वेष करीत होतों कीं, विरोधी भक्ति कीं काय म्हणतात त्या न्यायानं आमचं दोघांचं एकमेकांवर विलक्षण प्रेम बसलं होतं!–

मिरा:– म्हणजे – काय बोलतोय्स काय तूं?

अमृत:– अगदीं सरळ बोलतोंय् – एखाद्यावर आपलं आत्यंतिक प्रेम असलं कीं त्या माणसाचे विचार चोवीस तास आपल्या मनांत घोळत असतात. त्या माणसाशिवाय दुसरं कांहीं सुचत नाहीं. सुंदरलालबद्दलच्या आत्यंतिक द्वेषामुळें चोवीस तास त्याच्या संबंधींचे विचार या ना त्या कारणानं माझ्या मनांत घोळत असत – त्याच्याबद्दल एक प्रकारचं विलक्षण प्रेम माझ्या मनांत उत्पन्न झालं होतं. मी म्हणतों त्याचा अर्थ हाच. मला वाटतं, त्यालाही माझ्याबद्दल असंच कांहीं तरी विलक्षण – चमत्कारिक – आकर्षण वाटे – तुला आठवतं? आपलं लग्न झाल्यावर तुझ्या वडिलांचा नागपूरहून आलेला कांहीं तरी निरोप सांगण्याकरतां आपली मोटार खालीं उभी करून एकदां आपल्या बिऱ्हाडीं वर आला होता––

मिरा:– कधीं ?

अमृत:– तेव्हां माझ्याशीं किती मिठ्ठास वागला होता तो! –

मिरा:– मला नाहीं आठवत कांहीं. कधींचं सांगतोय्स तूं हें?

अमृत:– ढोंग पुरे कर हं, मिरा – आठवलंच पाहिजे तुला सगळं – तूंही अगदीं 'काकाजी काकाजी' करून त्याच्याशीं फारच सलगीनं बोलत होतीस त्या वेळीं—

मिरा:– मग – राजकारणांत तो आपला शत्रु असला तरी माझ्या वडिलांचा मित्र– नागपूरचा. एक माहेरचा माणूस म्हणून मला त्याच्याविषयीं थोडा आपलेपणा वाटणं साहाजिकच होतं. म्हणजे तेव्हां तूं 'जेलस्' झाला होतास कीं काय? अगबाई! मला कल्पनाच नाहीं –

अमृत:– सुंदरलालबद्दल 'जेलस्'? दुसऱ्या कुणाबद्दल 'जेलसी'ची गोष्ट काढली असतीस तर एक वेळ मी ऐकून घेतलं असतं; पण सुंदरलालबद्दल तुला कांहीं वाटेल, अशी चुकूनही माझ्या मनांत कल्पना येणं शक्य नाहीं. कमाल करतेस तूं, मिरा, केव्हां केव्हां!

मिरा:– कां – कां ? त्यांत कसली आली आहे कमाल ?

अमृत:– सुखाच्या किंवा संपत्तीच्या मोहानं – क्षणभरही विचलित न होतां एका कंगाल क्रांतिकारकाशीं लग्न करायला तयार झालेल्या मुलीला सुंदरलालसारख्या प्रतिगामी तत्त्वज्ञानाच्या गड्याबद्दल कांहीं वाटणं शक्य तरी—

मिरा:— हो–हो – हो अमृत – प्रतिगामी तत्त्वज्ञानाचा नी पुरोगामी विचारसरणीचा असल्या बाबतीशीं संबंध काय ?

अमृत:– दुसरा कसला संबंध असणंच शक्य नाहीं.

मिरा:–तुम्हां पुरुषांच्या प्रेमाच्या बाबतींत असेल तें खरं. आम्हां स्त्रियांचं प्रेम ही कांहीं वेगळीच चीज आहे. म्हणजे पुरुषांच्या प्रेमापेक्षां आमचं प्रेम कांहीं उच्च प्रकारचं असतं किंवा हलक्या प्रकारचं असतं असं मला म्हणायचं नाहीं – पण तें अजिबात वेगळ्या प्रकारच असतं एवढं मात्र खरं. तत्त्वज्ञान, विचारप्रणाली, चिकित्सा, विवेक या गुंतागुंती स्त्रीच्या प्रेमांत येत नाहींत – स्त्रीचं प्रेम ही एक नैसर्गिक सहजस्फूर्त, साधी, सरळ गोष्ट असते.

अमृत:– आपल्याला नाहीं पटत हें. दोन माणसांचं एकमेकांवर जर प्रेम असेल तर, तर त्यांची विचारसरणी, त्यांचं जीवनाचं तत्त्वज्ञान एकच — सारखंच असलं पाहिजे.

मिरा:– कां म्हणून ?

अमृत:– आपल्यासारखे विचार असलेल्या माणसावरच आपण मोकळ्या मनानें विश्वास टाकूं शकतों म्हणून. तसं नसेल तर कोणताही नवरा आपल्या बायकोवर विश्वासून राहूं शकणार नाहीं—

मिरा:– नी कोणती बायकोही नवऱ्यावर विश्वासून रहाणार नाही !

अमृत–( *चमकून चिडक्या स्वरांत* ) म्हणजे ?

मिरा:– ( *शांतपणें* ) सरळ आहे माझ्या म्हणण्याचा अर्थ – स्त्रियाही माणसंच असतात ना ?

अमृत:–( *गोंधळतो.* ) उगाच रागावतेस काय, मिरा. माझ्या सरळ बोलण्याचा कांहीं तरीच विपर्यास केलास तूं–असं काय, मिरा ? ( *तिच्याकडे टक लावून पहात* ) माझं तुझ्यावर कित्ती कित्ती प्रेम आहे ! – तुझंही

माझ्यावर आहे; होय ना ? (*ती मान हालवते.*) मग असं काय वेड्या-सारखं करतेस ?

मिरा:– अमृत, माझं तुझ्यावर कित्ती प्रेम आहे हें मी सांगायला का पाहिजे ?

अमृत:– ( *तिचा हात हातांत घेऊन* ) माझंही तुझ्यावर निरतिशय प्रेम आहे, मिरा. पण – पण — कालपासून – काल संध्याकाळपासून आपल्या संसारावर कसली तरी काळी छाया – सारखी – त्या सुंदर-लालच्या खुनाची बातमी ऐकल्यापासून—

मिरा:– मग विसर, विसरून जा ना ती गोष्ट. पुन्हां पुन्हां त्या खुनाच्या गोष्टी कां काढतोस ?

अमृत:– म्हणजे हें काय बोलणं झालं ? – तो भयंकर प्रसंग घडून अजून पुरते चोव्वीस तासही झाले नाहींत – नी विसरून जा काय ?— – तूं तर कालपासून भयभीत झाल्यासारखी दिसतेस.

मिरा:– कोण मी ? तुला काय वेड लागलंय कीं काय, अमृत ? मी काय म्हणून भयभीत होऊं ? माझा काय संबंध सुंदरलालच्या खुनाशीं ?

अमृत:– ( *दचकून* ) तुझा खुनाशीं संबंध ? ( *किंचित् थांबून, शांतपणें* ) खरंच. तुझा काय संबंध असणार ? ( *तो तिच्याकडे चमत्कारिक नजरेनें पहातो.* )

मिरा:– असं काय रे, अमृत ? माझा संबंध नाहीं, म्हणजे तुझा आहे असं मला म्हणायचं नाहीं. कालपासून मला कांहीं तरी चमत्कारिक वाटतंय् म्हणून मी असं कांहीं तरी बोलून जातें.

अमृत:– नुसतं कांहीं तरीच बोलली असतीस तर चाललं असतं एक वेळ – पण कां कुणाला ठाऊक; गेल्या चोव्वीस तासांत तूं माझ्यापासून सारखी दूर दूर जाते आहेस असं मला सारखं वाटूं लागलंय्. – तुझ्यासंबंधीं मला कांहीं तरी अबोध भीति वाटते, मिरा.

मिरा:– म्हणजे माझं तुझ्यावर प्रेम नाहीं, असं तुला वाटतं कीं काय ?

अमृत:– अं – हं – तूं मला सोडून जाशील, अशी भीति वाटते.

मिरा:– भलतंच कांहीं तरी! – तुला मी कधी सोडून जाणं शक्य आहे का, अमृत?

अमृत:– शक्य आहे नी शक्य नाही – काय सागावं!

मिरा:– अमृत, माझं जीवन – माझं जग सर्व कांही तू आहेस – तुझ्याशिवाय मी जगूं तरी शकेन का? (*थोडा वेळ स्तब्धता*) खायचं सर्व तसंच – राहूद्यत्रं की. खा ना. थंड होतोय् चहा.

अमृत:– मला कांहीं नको आतां.

मिरा:– असं काय रे? – मघांशीं अश्शी भूक लागलीय् म्हणून सांगत होतास – खा ना.

अमृत:– नको ग मला – मला मुळींच भूक नाही (*वर्तमानपत्र घेऊन उठतो.*)

मिरा:– रेडिओ लावू का? तुला बरं वाटेल जरा.

अमृत:- मला ठीक वाटतंय् – मेहेरबानी करून कांहीं करू नकोस तूं – त्या रेडिओनं माझा कपाळशूळ उठतो! (*टेबलाशीं बसून वर्तमान-पत्र वाचूं लागतो.*)

मिरा:– मर्जी तुझी. (*टेबलावरल्या चहाच्या सामानाची आवराआवर करूं लागते. सामान घेऊन ती सैपाकघरांत जाते – तो वर्तमानपत्र वाचण्यात गर्क आहे–थोड्या वेळानें ती परत येते.*) अमृत! (*त्याचें लक्ष नाहीं.*) काय म्हणतंय् वर्तमानपत्र? (*अमृत बोलत नाहीं. डोकें वर करून तो पहातो. त्याचे हात कांपत आहेत. तिच्याकडे एक दृष्टिक्षेप करून तो पुन्हां पेपर वाचू लागतो. ती त्याच्याजवळ जाते.*) मोठ्यांदा वाच की. मलाही कळूं द्या एवढं महत्त्वाचं काय वाचतोस् तें.

अमृत:– (*मोठ्यांदा वाचूं लागतो.*) 'सुंदरलाल खून - प्रकरणा-वर खळबळ उडवणारा नवीन प्रकाश. खुनी माणसाचा हेतु चोरीचा खास नव्हता.' (थांबतो.)

मिरा:– वाच ना पुढं. चोरीचा नव्हता तर कसला होता?

अमृत:– त्याच्या अंगावरल्या चोरीला गेलेल्या सर्व वस्तू पोलि-सांना सांपडल्या. जवळच घाईघाईनं त्या पुरून ठेवल्या होत्या. पोलिसांच्या शिकारी कुत्र्यांनीं त्यांचा बरोबर वास काढला.

मिराः– अगबाई ! शिकारी कुत्रे कशाला आणतात पोलीस ?

अमृतः– म्हणजे ? तुला माहीतच नाहीं का ? अगदीं व्यवस्थित शिकवलेले असतात हे कुत्रे. खून झालेल्या माणसाच्या नुसत्या रक्ताच्या वासावर खुनी माणसाचाही बरोबर माग काढतात ते.

मिराः– तें कसं काय ?

अमृतः– अग खुनी माणसाच्या अंगावर कुठं ना कुठं तरी रक्त उडालेलं असतंच की –

मिराः– काय भयंकर लोक आहेत पोलीस तरी ! – माणसाच्या मागं शिकारी कुत्रे लावायचे म्हणजे काय !

अमृतः– ( *कांहीं क्षण वर्तमानपत्र वाचतो.* ) पोलिसांना कांहींतरी महत्त्वाचा पुरावा सांपडलेला दिसतो. (*मोठयांदा वाचतो.*)

"कुत्र्यांनीं दाखविलेल्या वाटेवरून घाटकोपर – विक्रोळी रस्त्यावर मधल्या मैदानांत आठवडयाचा बाजार भरतो तिथं खुनी माणूस गेल्याचा पोलिसांना तलास लागला. बाजारांत नेहमीं दुकान मांडून बसणाऱ्या एका तरुण कापडविक्याला पोलिसांनीं संशयावरून पकडला आहे. संशयित माणसानं खून केल्याचें साफ नाकारलं आहे. पण त्यानं कांहींतरी महत्त्वाची माहिती पोलिसांना दिली आहे. या खुनामागें कांहींतरी राजकीय रहस्य आहे असं बहुतेक जाणत्या लोकांचं मत आहे. कामगार चळवळींत कै. सुंदरलाल यांना किती अगणित शत्रू होते, हें सर्वांना माहीत आहेच. खुनी माणूस त्यांच्यापैकींच कुणीतरी असावा, असा जाणत्यांचा तर्क आहे."

( *तो मनांतल्या मनांत वाचूं लागतो.* )

मिराः– ( *जवळच्या खुर्चीवर बसत* ) इतकंच ? आणखी नाहीं का कांहीं ?

अमृतः– आहे ना. स्वर्गवासी शेठ सुंदरलाल, ओ. बी. ई. यांचं संपादकांनीं छोटंसं रसभरीत चरित्र दिलं आहे. हें चरित्र वाचून तुकारामानंतर साधुपुरुष असा महाराष्ट्रांत एकटा सुंदरलालच होऊन

गेला असं कुणालाही वाटेल. ( *दुसरं पान उलटतो.* ) हें काय स्टॉप् प्रेसमध्यें ?–

"सुंदरलाल – खून-प्रकरणाला एकदम नवी कलाटणी – लवकरच कांहीं महत्त्वाची धरपकड होणार ! " ( *पेपर भिरकावून देतो आणि उठून इकडे तिकडे येरझाऱ्या घालूं लागतो.* )

मिरा:– काय रे, अमृत ? काय झालं ?

अमृत:– रक्ताचा वास काय – शिकारी कुत्रे काय – छे – छे – भयंकरच होतंय सर्व कांहीं.

मिरा:– तुला काय वाटतं, त्या कापडविक्यानं नसेल केला खून ?

अमृत:– कापडविक्यानं केला असेल तर आणखी महत्त्वाची धरपकड कशाला होणार ?

मिरा:– पोलिसांनीं मुद्दामच हूल उठविली असेल.

अमृत:– मला नाहीं वाटत तसं. पकडलेल्या माणसानं पोलिसांना कांहीं तरी महत्त्वाची बातमी दिली म्हणे. ( *एक एक शब्द मोजीत* ) त्याच वेळेला त्या एकान्त रस्त्यानं मी आलों – मला त्या रस्त्यानं येतांना तर त्या कापडविक्यानं पाहचलं नसेल ना ?

मिरा:– अमृत ! भलतंच काय कांहीं तरी–

अमृत:– कांहीं तरीच काय – खुनाच्या मागं कांही तरी राजकीय हेतु असावा असा पोलिसांचा अंदाज आहे. समजा, मी त्या रस्त्यान त्याच सुमारास येतांना त्या कापडविक्याच्या दृष्टीला पडलों – दुसरा कुणी दिसला असता तर वेगळी गोष्ट होती – पण माझ्यासारखा कामगार चळवळींतला सुंदरलालचा जगजाहीर प्रतिपक्षी त्याच सुमारास त्या रस्त्यानं येतो म्हणजे साहजिकच लोकांनीं तरी दुसरा काय अंदाज करावा ?

मिरा:– अंदाज केला तरी जें झालंच नाहीं तें त्यांना सिद्ध कसं करतां येईल ?

अमृत:– ( *प्रक्षुब्ध आवजांत* ) सिद्ध होवो अगर न होवो; पण मला हातकड्या घालण्याइतका – फांसावर लटकावण्याइतकाही पुरावा त्यांना खास मिळालाय् !

मिरा:– जगांत कांहीं न्याय अन्याय आहे कीं नाहीं, अमृत ?

अमृत:– न्याय नी अन्याय हे नुसते शब्द आहेत. – व्यवहारांत फक्त एकाच गोष्टीचा संबंध येतो. तो म्हणजे कायदा – नी कायदा ही कांहीं वेगळीच चीज आहे !

मिरा:– पण फार फार म्हणजे तुझ्या विरुद्ध फक्त अप्रत्यक्ष पुरावा – काय म्हणतात तें सर्कमस्टॅन्शिअल एव्हिडन्स आहे. प्रत्यक्ष पुरावा कांहीं नाहीं.

अमृत:– या सर्कमस्टॅन्शिअल एव्हिडन्सच्या आधावर आजपर्यंत थोडे लोक फांसावर लटकलेले नाहींत !

मिरा:– (*उठून पलीकडच्या खिडकीकडे जाते.*) पण पोलिसांचें कुत्रें बाजार भरतो त्या ठिकाणीं गेलें होतें. हा पुरावा कांहीं तुझ्या विरुद्ध नाहीं. उलट तुझ्या बाजूचाच आहे.

अमृत:– (*येरझाऱ्या घालीत*) विरुद्ध नसता पण गेला, पण –

मिरा:– पण काय ?

अमृत:– मी बाजारांतूनच आलों !

मिरा:– अं– तूं तर मला आल्याबरोबर सांगितलंस कीं, शॉर्ट कटनं तूं आलास म्हणून.

अमृत:– तूं उगाच रागावशील म्हणून मी खोटं बोललों. त्या बाजाराजवळच्या बारमध्यें मी नी चंपक आणखी एक बीअरचा ग्लास घ्यायला गेलों होतों !

मिरा:– अस्सं !

अमृत:– अशी काय पहातेस ? तेवढं खोटं बोललों, बुवा. आपण कबूल करतों. पण खोटं काय नी खरं काय – त्या माणसानं मला त्या रस्त्यानं येतांना पाहिलं असेल तर माझीं शंभर वर्षं भरलींच म्हणायचीं ! कुणीही न्यायाधीश माझ्या शब्दावर विश्वास ठेवणार नाहीं.

मिरा:– कां ? तूं खरं काय तें सर्व सांग म्हणजे झालं.

अमृत:– मी खरंच बोलेन ग; पण न्यायाधीश झाला तरी

एका काळचा तो वकीलच असेल ना – न्याय-अन्यायापेक्षां कायद्याची चौकटच त्याला दिसणार.

मिरा:– पण आपल्या पार्टीचे लोक तुझ्या बचावासाठीं एखादा उत्तमपैकीं वकील देतील ना.

अमृत:–(*चिडून*) जणुं काय मी पकडला गेलोंय् नी माझ्यावर खटला सुरूच झालाय् अशा सुरांत तूं बोलतेय्स !

मिरा:– माझ्यावर चिडूं नकोस उगाच. तूंच मघांपासून तसं बोलतोय्स. तुला बोलतांना कुणी ऐकलं असतं तर फांशीशिवाय जणुं काय तुला आतां सुटका नाहीं असं त्याला वाटलं असतं!

अमृत:– अस्सं ? दुसरी सुटका नाहीं अं ?

मिरा:–(*शांतपणें*) माझ्यावर कशाला गुरगुरतोस ? तूंच एखाद्या दोषी माणसासारखा बोलतोय्स.

अमृत:– मी दोषी माणूस ?

मिरा:- मी तसं मुळींच म्हटलं नाहीं – तुझ्या बोलण्यावरून दुसऱ्या कुणाला तसं वाटेल असं मीं म्हटलं.

अमृत:– तुलाच माझ्याविषयीं असा संशय वाटतो, तर मग पोलीस तर–

मिरा:– मला तुझा संशय येतो असं मी कध्धींच म्हणालें नाहीं, नी म्हणणार नाहीं. माझा तुझ्यावर पूर्ण विश्वास आहे.(*किंचित् थांबून*) पण तूं मात्र पुन्हां माझ्याकडे कधीं खोटं बोलूं नकोस.

अमृत:–कधीं खोटं बोललों मी ? हो! मघांशीं ( *खालीं बसतो* ). चुकलंच तें. तुला खोटं सांगायचं कांहींच कारण नव्हतं. (*किंचित् थांबून* ) काय ग, त्या कापडविक्यानं मलाच पाहयलं असेल ?

मिरा:– मी काय सांगूं ?

अमृत:- दिसलों असेन मी एखादे वेळीं त्याला – जंगलांतल्या त्या पायवाटेनं मी बाहेर पडलों नी चंपक बारमध्यें गेला होता म्हणून बाजारांतल्या वाटेनं बारमध्यें गेलों. कदाचित् पोलिसांचा चावटपणासुद्धां असेल – आमच्या चळवळीचा कांटा काढण्याकरतां आमच्यापैकीं कुणावर तरी असली भलतीच तोहमत आणण्याचाही त्यांचा विचार

असेल – ( *डोकें धरून उभा राहातो.* ) मिरा, मिरा, माझं डोकं फिरून जाईल असं वाटतं !

मिरा: – पण उगाचच्या उगाच तूं स्वत:ला इतका त्रास करून कां घेतोयुस ?

अमृत:— त्रास करून घेऊं नको, तर काय या भयंकर चमत्कारिक परिस्थितींत नाचूं, बागडूं, उडया मारूं ?

मिरा:–( *त्याच्या खांद्यावर हात ठेवून* ) कित्ती त्रास करून घेतोस जिवाला उगीच !

अमृत:– मी करूं तरी काय ? फांशीची मला भीति वाटते असं नव्हे. साऱ्या आयुष्यभर स्वातंत्र्य, समता, मानवता या तत्त्वांसाठीं मी झगडलों. मानवी जीवन ही एक अमोल, पवित्रतम गोष्ट आहे हें तत्त्वज्ञान घसा कोरडा पडेपर्यंत जगाला सांगत सुटलों नी आतां असल्या घाणेरडया आरोपावरून – छे ! – आतां कुठं कामगार चळवळींत माझं वजन वाढूं लागलं होतं. कामगार माझ्यावर विश्वास टाकूं लागले होते – माझ्या शब्दाला किंमत येत होती त्या वेळीं — अगदीं त्याच वेळीं हा कांहींतरी चमत्कारिक प्रकार घडावा, नी आयुष्यभर एका उदात्त ध्येयासाठीं केलेला सर्व झगडा मातीमोल व्हावा–

मिरा:– कांहीं तुझा झगडा मातीमोल होत नाहीं, अमृत – तुझे मित्र तुला पूर्ण ओळखून आहेत. तुझ्यावरचा त्यांचा विश्वास कधीच ढळणार नाहीं.

अमृत:– आहेत माहीत सर्व मित्र. पार्टीला माझा उपयोग नाहीं असं दिसूं लागल्याबरोबर मला कुण्णी विचारणार नाहीं. जागतिक क्रांतीच्या या महान् चळवळींत एका क्षुद्र व्यक्तीची कोण तमा धरतो ? माझ्या साहाय्याला कुण्णी धांवून येणार नाहीं.

मिरा:– तुझं डोकं अगदीं भडकून गेलंय, अमृत. तोंडाला येईल तें बरळतोयूस तूं – कशाला कांहीं नाहीं नी तूं उगाच आरडाओरड करतोयुस !

अमृत:– कशाला कांहीं नाहीं ? उगाच आरडाओरड ?

मिरा:– हें बघ, खरोखरच तुझ्यासंबंधीं कुठं कांहीं संशय असता,

तर एव्हांना पार्टींतल्या तुझ्या मित्रांनीं तुला सावधगिरीची सूचना खात्रीनं दिली असती.

अमृतः– असं वाटतं तुला ? ( *विचार करतो.* ) कुणीतरी बोलला असता माझ्याजवळ; नाहीं ? मी उगाच आपलं डोकं पिकवून घेतोंय् कीं काय ? तें कांहीं असलं तरी सुंदरलालचा समंध माझं डोकं जें धरून बसला आहे तें कांहीं केल्या तो सोडीत नाहीं – काय असेल तें असो, मिरा – पण–

मिराः– पण काय ?

अमृतः– ( *एक एक शब्द मोजीत* ) मला स्वतःलाच सारखं असं वाटतं कीं, या खुनाच्या भानगडींत माझा कांहीं तरी संबंध आहे ! ( *ती एकदम दचकते.* ) केवढ्यांदा दचकलीस !

मिराः– कुणीही दचकलं असतं – तूं काय बोलतोय्स तें तुला तरी कळतंय ना ?

( *पोलिसांच्या लॉरीवर असलेल्या विशिष्ट शिंगाचा आवाज खालीं रस्त्यावरून ऐकूं येतो.* )

मिराः– ( *पुन्हां दचकून* ) अग बाई ! हें काय ?

( *दोघेंही श्वास कोंडून जवळ जवळ येणारा तो आवाज ऐकत उभीं आहेत. खालीं घराच्या दाराशीं ती लॉरी येऊन उभी राहिल्याचा आवाज. मिरा खिडकीशीं धांवत जाऊन खालीं पहाते.* )

अमृतः– पोलीसच ना ? ( *मिरा मान हालवते.* ) आपल्या इथंच येत असतील ?

मिराः– हो. ( *खिडकीबाहेर पहात* ) कदाचित् इथं नसतील येत ते. ( *ती दरवाजाकडे जाऊं लागते.* )

अमृतः– ( *बेभानपणें* ) इथंच, इथंच येताहेत ते.

मिराः– तूं गप्प रहा बघूं, अमृत. ( *दरवाजाला कान लावून ऐकते.* ) पोलिसांना आपला हा नवा पत्ता कुठं माहीत आहे ?

अमृतः– त्यांना सर्व माहीत आहे. कालच घाटकोपरचा एक पोलीस मला विचारीत होता, "काय साहेब, दादरला गेलांत वाटतं रहायला ?" – जिन्यावर त्यांच्या पावलांचा आवाज येतोय् का ? ( *मिरा*

*कान लावून ऐकते.* ) मिरा, तुझा तरी माझ्यावर विश्वास आहे ना?

( *खालीं कुणीतरी बोलत असल्याचे आवाज ऐकूं येतात.* )

मिरा:– शू:! चूप! कांहींतरी बोलताहेत ते खालीं – शोधताहेत कुणाला तरी.

( *खालच्या मजल्यावरलें दार ठोठावल्याचा आवाज. खाड् खाड् धाड् धाड् असे आवाज, ओरडाओरड, एका बाईची किंकाळी, दरवाजा खाड्कन लावल्याचा आवाज.* )

मिरा:– नाहीं. आपल्या इथं नाहीं आलेले ते.

अमृत:– कशावरून? सर्व बिल्डिंगची झडती घेत असतील. शेवटीं येतील ते इथं. (*कांहीं क्षण स्तब्ध राहून* ) एकदमच इथं कां नाहीं आले? (*डोकें हातांत धरून खुर्चीवर बसतो. कांहीं माणसांचे आवाज. आवाज थांबतात. एका बाईचें रडणें ऐकूं येत आहे.*)

मिरा:– अमृत, गेले निघून ते!

अमृत:– खरंच गेले?

मिरा:– (*दरवाजा किलकिल करून बाहेर पहाते.*) हो. गेले – नक्की.

अमृत:– (*उठून उभा रहातो.*) हं आमच्याकरतां नव्हते आले म्हणायचे! (*कांहीं तरी आवाज ऐकूं येतो.* ) काय ग हें?

मिरा:– कुणी तरी बाई माणूस रडतंय् खालच्या मजल्यावर.

अमृत:– (*दरवाजाकडे जातो.* ) कां म्हणून एका बाईमाणसाच्या वाटेला गेले ते – मला पाहिलंच पाहिजे खालीं जाऊन.

मिरा:– नको जाऊंस तूं खालीं एव्हां. (*त्याला अडवते.* )

अमृत:– म्हणजे – गेलंच पाहिजे मला त्या बाईची चवकशी करायला- जाणार मी. (*तिला बाजूला करून बाहेर पडतो. जातांना दरवाजा ढकलून लावतो. मिरा डोकें हातांत धरून बसली आहे. इतक्यांत खालून पोलिस- लॉरीच्या विशिष्ट शिंगाचा आवाज ऐकूं येतो. लॉरी चालू झाल्याचा आवाज. मिरा दचकून खिडकीकडे धांवते. ती बाहेर पहाते. लॉरी दूर निघून गेल्याचा आवाज. बाई माणसांच्या रडण्याचा आवाज आतां थांबला आहे. थोड्या वेळानें अमृत येतो. आंत येऊन तो खुर्चीवर अंग टाकतो.* )

मिरा:– ( *त्याच्याजवळ जाऊन* ) कोण रडत होतं?

अमृत:— तिच्या मुलाला हातकड्या घालून घेऊन गेले.

मिरा:— कुणाच्या ?

अमृत:— खालीं चार नंबरच्या ब्लॉकमध्यें कुणी एक विधवा बाई आहे तिच्या.

मिरा:— म्हणजे काल आपण सामान वर आणतांना स्वतः होऊन हात द्यायला पुढं आला, तो गोरटेलासा मुलगा का ?

अमृत:— होय.

मिरा:— केलं काय त्यानं ?

अमृत:— अंडरग्राऊंड चळवळचा होता तो. बॉम्ब टाकून एका पोलिसाचा खून केल्याचा आरोप आहे त्याच्यावर.

मिरा:— काय, त्यानं खून केला म्हणतोस ?

अमृत:— होय. असा आरोप आहे त्याच्यावर.

मिरा:— छे ! शक्यच नाहीं. किती सालस दिसत होता तो चेहेऱ्यावरून !

अमृत:— तुझं म्हणणं, त्याचा चेहेरा खुनी माणसासारखा दिसत नव्हता; होय ना ?

मिरा:— (*अडखळत*) त्याचा चेहरा ? हो. त्याचा चेहरा ( *अमृतच्या तोंडाकडे पहात* ) खुनी माणसासारखा मुळींच दिसत नव्हता.

अमृत:— ( *तिच्या दृष्टीचा अर्थ समजून, एकदम* ) अस्सं ?— म्हणजे माझा जसा दिसत नाहीं तसा; होय ना ?

मिरा:— उगाच कांहीं तरी उकरून काय काढतोस, अमृत ?

अमृत:— मला पोलीस पकडून नेतील तेव्हां लोक असंच म्हणणार, "मानवी जीवनाच्या पावित्र्याच्या मारे काय बकवा करीत होता!— वैयक्तिक अत्याचारावर केवढा दांत त्याचा — पण दिसतं तसं नसतं, हेंच खरं ! "

मिरा:— पुरे झाली बाबा तुझी ही वटवट. किती म्हणून पुन्हां तेंच तेंच उगाळशील ? मी या सगळ्या प्रकारांनीं अगदीं घाबरून गेलेय्.

अमृतः– ( *तिच्याजवळ जातो* ) आय अॅम् सॉरी, मिरा! मी उगाच तुझा जीव खातोंय्.

मिराः– ( *हुंदके देत* ) तूं काय माझा जीव खाणार?

अमृतः– ( *तिच्याजवळ बसतो.* ) शपथेवर सांगतों तुला, मिरा. तो सुंदरलाल नी त्याचा तो खून या गोष्टींचं पुन्हां मी नांव काढणार नाहीं. झालं?

मिराः– खरंच नकोत त्या गोष्टी. आपण आपल्या नव्या संसारा-विषयीं कांहीं तरी बोलूं या की–

अमृतः– ( *तिच्या कमरेभोंवतीं हात टाकीत* ) ओ – यस्– यस्– यस्– अगदीं तसंच – तूं माझ्यासंबंधीं बोल नी मी तुझ्यासंबंधीं बोलतों. ( *तिचें तोंड आपल्या तोंडाजवळ आणून* ) माझी लाडकी मिरा!

( *किंचित् स्तब्धता. टेलिफोन वाजूं लागतो. तीं दोघें एकमेकांपासून दूर होतात. मिरा पुढें होऊन टेलिफोन घेते.* )

मिराः – हलो – हं – हं – हो मी मिसेस् जाधव. कोण – अमृत? थांबा हं – ( *टेलिफोनचें तोंड हातानें घट्ट झांकून धरून* ) पटेल विचारतोय्—

अमृतः– माझी खात्री आहे, या सुंदरलालच्या खुनासंबंधींच कांहीं तरी असणार. डॅम् हिम्—

मिराः– हं. ( *टेलिफोनमध्यें* ) येतायृत हं अमृत.

( *अमृत उठतो, ती टेलिफोन त्याच्या हातांत देते.* )

अमृतः– ( *टेलिफोनमध्यें* ) हॅलो –हं – पटेल – बरं – बरं – छान केलंस ना टेलिफोन केलास तो! – हो – पाहिचला संध्याकाळचा पेपर – हं – हं – आपल्या पार्टीतल्या कुणावर तरी संशय आहे? – नॉनसेन्स! – ( *टेबलाच्या टोंकावर बसतो.* ) आमच्या पार्टी-सभासदांना कांहीं वेड लागलेलं नाहीं. असला प्रकार करून पार्टी आतां चांगली वाढते आहे तिच्यावर मुद्दाम संकट कोण आणील? – छे – कांहीं तरीच! – सुंदरलाल जिवंत राहाण्यांतच आपल्या पार्टीचा फायदा होता – असला दुष्ट शत्रु सदैव डोळ्यांसमोर असला कीं कामगार वर्गातल्या आप-ल्या प्रचाराला विलक्षण जोर येतो, हें काय आपल्या पार्टीच्या

लोकांना माहीत नाहीं कीं काय ? – छे – छे – मला नाहीं वाटत. काय ? – काय ? ( *टेलिफोनचे तोंड हातानें झांकून धरतो* ) अरे बाप रे !

मिराः– ( *उभी राहून* ) काय, काय ?

अमृतः– शू: ! ( *तिला गप्प राहायला खुणावतो आणि टेलिफोनमध्यें बोलूं लागतो.* ) हलो. पटेल, अगदीं खरं खरं सांग – काय, कुणकुण ऐकलीस तरी काय तूं ? – जंगलांतल्या पायवाटेनं बाहेर पडतांना त्या कापडविक्यानं कुणाला तरी पाहिलं, हें वाचलं मीं – मग हं – अरे, पण मी त्या पायवाटेनं सरळ बारमध्यें नाहीं का आलों तुला भेटायला ? मग ? – काय – तो कापडविक्या म्हणतो ती आकृति कदाचित् स्त्रीचीही होती – असेल – ( *मिरा दचकते. ती श्वास कोंडन धरून ऐकते आहे.* ) ओ हो, कदाचित् स्त्री असेल ! – अस्सं ? हं – मग काय ? मी ? ( *अडखळत* ) मी सर्व बाडबिछाना गुंडाळून बायकोसह एकदम गोव्याला निघून जाऊं ? हो – हो – ( *चिडून* ) मजा ? – मजा खरी ! गोव्याच्या ट्रिप्स् काढणं हें आतांपर्यंतच्या माझ्या धडपडीचं ध्येय नव्हतं, पटेल ! – हो – मग एकदम स्वर्गांतच कां नको जाऊं ? – ऐकतोंय् – ऐकतोंय् – पार्टी कमिटीचं असं म्हणणं आहे, होय ? – अस्सं ! – पार्टीवर उगाच कांहीं किटाळ येऊं नये म्हणून ? अस्सं ! बरं – बरं – करतों विचार – ( *टेलिफोन खालीं ठेवण्याच्या बेतांत आहे, इतक्यांत पुन्हां झटक्यानें टेलिफोन तोंडाशीं आणून मोठ्यांदा ओरडतो.* ) हलो – हलो - पटेल – पार्टी कमेटीला म्हणावं, तुम्ही सर्वजण खड्डयांत पडा – डॅम् यू ! – लाजा नाहीं वाटत माझा संशय घ्यायला म्हणावं – माझं आतांपर्यंतचं कार्य – ( *टेलिफोन खाड्कन् खालीं ठेवतो. समोर शून्यपणें पहात तिथेंच उभा आहे.* )

मिराः– ( *शांतपणें* ) अमृत !

अमृतः– ( *श्रांत स्वरांत* ) काय ?

मिराः– काय म्हणतात पार्टीचे लोक ?

अमृतः– ( *शांतपणें* ) मला हद्दपार करताहेत ! – नव्हे चुकलों – गोव्याची ट्रिप् काढायला सांगताहेत ! – सर्व बाडबिछाना – बायको घेऊन

मी गोव्याला जायचं, नी तिथं अनिश्चित काळ रहायचं – पार्टी पुन्हां ये म्हणेल तेव्हां यायचं !

मिरा:– ( *थोडा वेळ विचार करून* ) खरंच, अमृत, कांहीं दिवस आपण बाहेरगांवीं जाऊन रहाणें, हें एका दृष्टीनं बरंच नाहीं का ?

अमृत:– किती वेडी आहेस तूं, मिरा ! या वेळीं आपण जर गोव्याला पळून गेलों, तर माझे मित्र तरी मी निरपराधी आहें यावर विश्वास ठेवतील का ? कांहीं अपराध नसतां, जन्मभर एक गुन्हेगार म्हणून माझ्या कपाळावर कायमचा छाप बसेल—

( *समोर शून्यपणें पहात तो कोचावर बसतो. ती त्याच्याजवळ जाऊन बसते – त्याच्या खांद्यावर हात ठेवून* )

मिरा:– ( *प्रेमळपणें* ) कसला एवढा विचार करतोय्स, अमृत ?

अमृत:– स्वत: होऊन पोलीस स्टेशनवर जाऊन मी सांगूं का पोलिसांना ?

मिरा:– पोलिसांना काय सांगणार तूं ?

अमृत:– कीं काल रात्रीं खून झाला त्या वाटेनंच मी आलों. मला तिथं कांहींच विशेष दिसलं नाहीं –

मिरा:– ( *शहारल्यासारखें करून ताड्कन् उठून उभी रहाते.* ) वेड लागलंय् कीं काय तुला ?

अमृत:– या प्रकरणाचा कांहीं सोक्षमोक्ष लावतां आला नाहीं नी असाच विचार करीत राहयलों तर मात्र खात्रीनें लवकरच वेड लागेल मला !

मिरा:– ( *कांहीं क्षण स्तब्धतेंत गेल्यानंतर* ) पटेल कुणासंबंधीं बोलत होता ?

अमृत:– पोलिसांनीं पकडलेल्या त्या कापडविक्याच्या जबानीसंबंधीं बोलत होता तो –

मिरा:– काय आहे त्याच्या जबानींत ?

अमृत:– त्याच्या जबानीवरून आमच्या पार्टीपैकीं कुणावर तरी गदा येण्याचा संभव आहे –

मिरा:– पार्टींतल्या माणसावर कशी गदा येईल ? त्याला दिसलेली आकृति स्त्रीसारखी होती असं कांहीं म्हणाला ना तो ?

अमृत:– हो – अर्धीच कांहीं तरी जबानी आहे त्याची –

मिरा:– मला वाटतं, त्यानं कुणालाच पाहृयलेलं नाहीं – स्वत:ची कातडी बचावण्याकरतां तो कांहीं तरी थापा मारतोय्.

अमृत:– असेल – तसंही असेल – पण मग मला गोव्याला निघून जायला पार्टी कमिटी कशाला सांगतेय् ? *(उठून येरझाऱ्या घालूं लागतो.)* कांहीं तरी कळलंय त्या लोकांना – नी मला सर्व कांहीं सांगत नाहींत ते. माझ्याविषयीं त्यांना कांहीं तरी संशय आहे. पटेलच्या बोलण्या-वरून तर तसं स्पष्ट दिसत होतं; पण त्यांना असं कां म्हणून वाटावं – कां म्हणून ? जंगलांतल्या पायवाटेनं मी आलों खरा – पण मीं तिथं कांहींच – खरोखरच – कांहींच केलं नाहीं. कांहीं पाहृयल्याचंही मला आठवत नाहीं. सुंदरलाल म्हणजे काय कोडमुंगी होता कीं काय, कीं आपला सहज मला न कळत माझ्या पायाखालीं तो चिरडला गेला ! – मग या प्रकरणांत माझा कांहीं तरी संबंध आहे असं माझं मलाच कां वाटतं ? छे: ! – कांहीं कळत नाहीं.

मिरा:– त्या माणसाला पण तसं कां वाटावं ?

अमृत:– काय ?

मिरा:– कीं ती आकृति कदाचित् स्त्रीची असावी.

अमृत:— त्याला तसं कां वाटलं तें आपल्याला कसं सांगतां येणार ? ती आकृति स्त्रीचीच होती असं कांहीं खात्रीपूर्वक तो सांगत नाहीं. कदाचित् असेल असं म्हणतो तो.

मिरा:– किती काळोख असला तरी तुझी आकृति स्त्रीसारखी दिसणं शक्यच नाहीं.

अमृत:— माझी ? छे:– माझी आकृति कशी दिसेल स्त्रीसारखी ? *(तिच्या तोंडाकडे टक लावून पहातो.)*

मिरा:–*(घारबट स्वरांत )* मग कुणाची आकृति दिसली तर त्याला ?

अमृत:– तूं म्हणतेस तें खरं आहे. मला नसेल पाहृयलं त्यानं.

मिरा:– मग कुणाला पाहृयलं तर त्यानं ? *(अमृत कांहींच बोलत*

*नाहीं. ती त्याच्याजवळ जाते.)* बोल ना – तुझं डोकं अगदींच कसं चालत नाहीं? आतांपर्यंतच्या तुझ्या बोलण्यावरून जणुं काय तुझ्याखेरीज दुसऱ्या कुणावरच संशय असणं शक्य नाहीं असं तूं भासवीत होतास –नी आतां त्याच्या अगदीं उलट बोलयला लागलायस – कीं तुझ्यावर संशय असणं शक्यच नाहीं! माझा असा गोंधळ झालाय् म्हणून सांगूं! ती आकृति स्त्रीचीच असावी कशावरून?

अमृत:– खुनी माणूस स्त्रीच असण्याचा अधिक संभव आहे. म्हणजे मग या खुनाच्यामागें कांहीं राजकीय रहस्य असेल असा समज करून घेण्याचं कांहींच कारण नाहीं – कांहीं तरी घाणेरडं खासगी लफडंच त्यामागं असणार.

मिरा:– स्त्रीच्या हातून खून झाला कीं त्यामागं कांहीं तरी घाणेरडं लफडं असलंच पाहिजे, असा निर्विवाद सिद्धांत आहे वाटतं?

अमृत:– माझ्या म्हणण्याचा अर्थ तसा नव्हे ग – सुंदरलालचीं अनेक स्त्रियांशीं घाणेरडीं लफडीं होतीं म्हणून म्हणतों मी–

मिरा:– (*ओरडून*) साफ खोटं आहे तें!

अमृत:– (*चमकून*) अं! तुला एवढी त्याच्यासंबंधीं खात्री वाटायचं कारण काय?

मिरा:– (*गोंधळून*) मी – हो – सुंदरलालचीं अनेक स्त्रियांशीं घाणेरडीं लफडीं होतीं हें तूं मला पूर्वी कधींच सांगितलं नव्हतंस— मृतमाणसाविषयीं वाईट शब्द काढणं हें कांहीं सभ्यपणाचं लक्षण नव्हे.

अमृत:– (*चिडून तिच्याकडे जातो.*) तुझं डोकं फिरलंय कीं काय मिरा? सुंदरलालचा खून करणारी व्यक्ति स्त्रीच असावी – मला कांहीं काळजी करण्याचं कारण नाहीं असं तूंच मघाशीं सारखं सुचवीत होतीस, नी आतां मारे स्त्रियांचा कैवार घेऊन खुनी स्त्रीची बाजू घेऊन माझ्याशीं भांडतेस! खुनी स्त्रीचा कैवार घ्यायचं तुला काय कारण? खून म्हणजे खून – मानवी जीवनाबद्दल इतकी हीन—

मिरा:– पुरे कर तुझी व्याख्यानबाजी!

अमृत:– (*चिडून*) मिरा!

मिरा:– तुला चिडायचं कांहींच कारण नाहीं.

अमृत:– *( तिच्याजवळ जाऊन कोचावर बसतो. )* मिरा–ए मिरे – असं काय करतेस ? मी मुळींच चिडलों नाहीं. स्त्रियांशीं सुंदरलाल करीत असलेल्या सर्व घाणेरड्या भानगडी मीं तुला सांगितल्या नाहींत म्हणून तूं मघाशीं माझ्यावर चिडली होतीस – त्यांत सांगायचं काय ? सुंदरलालच्या भानगडी सर्व जगाला माहीत आहेत. गांवांत काय कुटाळक्या चालतात त्या तुझ्या कानावर येत नाहींत कीं काय ?

मिरा:– येतात तर ? मला दुसरा काय धंदा आहे ? – सगळ्या गांवभर हिंडून कुणाची काय लफडीं चाललीं आहेत, नी कुटाळकीचे काय ताजे विषय आहेत तेच मी गोळा करीत असतें !

अमृत:– *( तिला शांत करण्याचा प्रयत्न करतो. )* मिरा, ए मिरे –

मिरा:— *( वेडावीत )* पुरे झालं तुझं मिऱ्या – ए मिऱ्ये ! दुसरं बोल कांहीं तरी. आणि काय रे, सुंदरलालचा खून एखाद्या पुरुषानं केला तर मात्र त्यामागं कांहीं तरी राजकीय रहस्य असलं पाहिजे नी बिचाऱ्या एखाद्या स्त्रीनं केला असेल तर मात्र कांहीं तरी घाणेरडं लफडं आहेच; असं कां ?

अमृत:– जरा ऐकून घेशील का माझं म्हणणं, मिरा ? स्त्रीनं केला काय किंवा पुरुषानं केला काय, खून म्हणजे खून. हें मी कबूल करतों; पण राजकीय हेतूनें जेव्हां खून केलेला असतो तेव्हां तो कितीही चुकीचा असला तरी करणाराचे हेतू उदात्त नी वृत्ति वीराची असते यांत शंका नाहीं. एखादी स्त्री जेव्हां एखाद्या पुरुषाचा खून करते तेव्हां बहुधा एक ठराविक कारण असतं – आपलं काम होईपर्यंत त्या पुरुषानं तिचा उपयोग केलेला असतो, नी काम झाल्याबरोबर त्यानं तिला उडवून दिलेली असते.

मिरा:— अस्सं – अस्सं ? म्हणजे तुझ्या मतें उदात्त राजकीय हेतूनं प्रेरित होऊन कुणाचा खून करणं स्त्रीजातीला शक्यच नाहीं !

अमृत:– तूंच कांहीं वेळापूर्वीं मला सांगत होतीस कीं विवेक, चिकित्सा, तत्वज्ञान या भानगडींचा स्त्रीजीवनाशीं फारसा संबंध येत नाहीं – भावनेच्या आवेगांत स्त्री सर्व कांहीं करीत असते म्हणून.

पण हें स्त्री-पुरुषांचं भांडण आपल्याला भांडायचं कारण काय आहे, मिरा ?

मिरा:– मी कुठं भांडतेंय्?–तो पकडलेला माणूस म्हणाला कीं, त्याला स्त्रीची आकृति जंगलांतून बाहेर पडतांना दिसली. त्यावरून सर्व हें आलं.

अमृत:– तें मी विसरलोंच. ( *कांहीं क्षण स्तब्धता* ) समजा, खून करणारी व्यक्ति स्त्रीच असेल, तर? ( *विचार करीत* ) आमच्या पार्टीच्या गुप्त गोष्टी माहीत असलेली आमच्यापैकींच एखादी स्त्री असेल तर ?

मिरा:– ( *चमकून* ) आपल्यापैकींच एखादी ?

अमृत:– ( *एक एक शब्द मोजीत* ) तसं असेल तर या प्रकरणावर खूपच प्रकाश पडेल. ( *मिराच्या तोंडाकडे पहात* ) तुला नाहीं वाटत मिरा ?

मिरा:– ( *ताड्कन् उठून* ) सरळ सरळ माझ्यावर आरोप करायचा तुझा विचार आहे कीं काय ? ( *एकदम चिडून* ) मला वाटलंच. तुला वाटतंय कीं मींच खून केलाय्–होय ना ? पोलिसांना बोलाव टेलिफोन करून–जा कर ना–पोलिसांना सांग, तुला सर्व बातमी लागलीय्–मला प्रत्यक्ष पाहयलंस तूं खून करतांना–त्यांना सांग माझ्या बायकोनं खून केला– ( *हातांनीं तोंड झांकून केविलवाण्या सुरांत स्फुंदूं लागते.* )

अमृत:– मिरा–मिरा, काय हें ? ( *तिला जवळ घेतो.* ) किती वेडी मुलगी आहेस तूं ! मी सर्वसामान्यपणें बोलत होतों तें तूं स्वतःला काय लावून घेतेस ? तुझं नेहमींचं हें अस्सं आहे.

मिरा:– ( *त्याच्या मिठींतून सोडून घेते.* ) खरंच, तुला वाटतं मी खून केला असेन असं ?

अमृत:—शट् अप् ! गाढवासारखं कांहीं तरी बोलूं नकोस ! या नवीन सुचलेल्या मुद्याचा मला नीट विचार करूं दे. ( *स्वतःशीं विचार करतो.* ) सुंदरलालला आमच्या पार्टीचीं सर्व गुपितं नेहमी कळायचीं–

कोणतीही गोष्ट करायला द्या – त्याला त्याची अगोदरच बित्त बातमी—

मिरा:– त्याच्या खुनाशीं या गोष्टीचा संबंध काय?

अमृत:– कदाचित् नसेल कांहीं संबंध. तरी पण–

मिरा:– अमृत, तरी पण काय?

अमृत:– गप्प बस बघूं थोडा वेळ – मला जरा विचार करूं दे.

मिरा:– (*चिडून*) नाहीं बसणार गप्प! मला माहीत आहे मला तूं अगदीं बेअकली समजतोस तें– तोंडावर कधीं म्हणत नाहींस तसं-पण तुझ्या वागण्यांत नेहेमीं दिसून येतं तें – तुला वाटतं – मला माहीत आहे तुला काय वाटतं तें–

अमृत:– तुला काय काय वाटतं तें सर्व कांहीं मग मला केव्हां तरी फुरसदीच्या वेळीं सांग. आतां थोडा वेळ मला विचार करूं देशील का?

मिरा:– म्हणजे? या घरांत मला बोलायचीही बंदी आहे का?

अमृत:– (*अधीरपणें*) मिरा, तुला कसं कळत नाहीं? मला शांतपणें थोडा वेळ विचार करायचाय्–तूं जरा आंतल्या खोलींत जाऊन बस ना थोडा वेळ.

मिरा:– मी तुला नकोशी झालेय् घरांत, असं स्पष्टच सांग ना.

अमृत:– (*शांत आवाजांत*) बरं – बस तूं इथंच. (*उठून आंत जातो.*)

मिरा:– अमृत !

(*तो आंत जातो. ती त्याच्या मागें जाऊन आंत डोकावून पहाते. तो कोट-टोपी घालून बाहेर येतो.*) कुठं चाललास?

अमृत:– बाहेर कुठं तरी जातों. (*तो दरवाजाकडे जाऊं लागतो. मिरा त्याच्यामागें जाते.*)

मिरा:– कुठं? (*तो उत्तर देत नाहीं.*) नको जाऊंस – रागवलास बाटतं? (*त्याला अडवते.*)

अमृत:– (*तिला बाजूला ढकलतो.*) स्वतःच्या घरांत पांच मिनिटें स्वस्थ बसायची सोय नाहीं; मग करूं तरी काय?

(*खिशांत हात घालतो*) वारा बराच सुटलाय्. माझा लाल मफलर

कुठं आहे? नाहींसा झाला? (*मिरा चमकते.*) बरं जाऊं दे – जातों मी. (*दरवाजा उघडतो.*)

मिराः– अमृत !

अमृतः– हं – काय ?

मिराः– कुठं चाललास तें सांग ना मला. (*तो तिच्याकडे नुसत्या चमत्कारिक नजरेनें पहात उभा राहातो.*) केव्हां परत येशील ?

अमृतः– कांहीं सांगतां येत नाहीं.

(*दरवाजा ढकलून बाहेर जातो.*)

मिराः– (*रडक्या आवाजांत*) अमृत – अमृत – नको रे जाऊंस मला एकटीला सोडून – खरंच मी चिडायची नाहीं – अमृत – (*दरवाजा उघडून खालीं जिन्याकडे पहाते.*) अमृत, ये ना परत–

(*अमृत येत नाहीं. दरवाजा लावून घेऊन सर्व गात्रें गळाल्यासारखी एक एक पाऊल टाकीत ती परत येते. हुंदके देत ती कोचावर अंग टाकते. तोंच* पडदा खालीं येतो. )

# फांस

## अंक ३ रा

*( स्थळः— दुसऱ्या अंकांतलेंच. वेळः— पहांटेपूर्वींची.)*

*( टेबलावरचा दिवा तसाच आहे अमृतनें दार ढकलल्याबरोबर तें उघडतें. मिरा आवाजानें दचकून जागी होते.)*

मिराः– अमृत, हें काय रे ? मला हांक तरी मारायची—

*(तो श्रांत दृष्टीनें समोर पहात कांहीं न बोलतां उभा आहे.)* कुठं गेला होतास ?

ह *(तो अजूनही बोलत नाहीं. )*

तूं परत येईपर्यंत पुस्तक वाचीत बसण्याचा मी प्रयत्न केला. पण मला वाटतं, वाचतां वाचतांच मला झोंप लागली. किती वाजलेत आतां ?

अमृतः– सहा.

मिराः– काय, सहा ? म्हणजे ? मला वाटलं अकरा बाराच वाजले असतील रात्रींचे. *( तो कांहीं बोलत नाहीं. )* अजूनही राग गेला नाहीं वाटतं कालचा ? मीं कांहीं तरीच बोललें काल. अमृत, मी वेडी आहे रे, मला क्षमा कर.

अमृतः– ( *हंसण्याचा प्रयत्न करीत श्रांत स्वरांत*) छे! मिरा, मी मुळींच रागावलों नाहीं. आतां कुणावर कधींच रागावणार नाहीं मी. ( *तिच्या खांद्यावर हात ठेवतो.* ) मी दमलोंय् – अगदीं गळून गेलोंय् मी, मिरा. ( *कोट, बूट, वगैरे काढून ठेवूं लागतो.* )

मिराः– पड ना इथं जरा कोचावर.

अमृतः– (*बसतो*) छे, आतां झोंप येणार नाहीं मला. चहा कर तूं.

मिराः– अमृत, कुठं भटकलास रात्रीं ?

अमृतः– कुठं भटकलों-खरंच कुठं भटकलों ?

मिराः– असं काय रे ?

अमृतः– खरंच मला माहीत नाहीं, मिरा.

मिराः– म्हणजे ?

अमृत – पहिले दोन तीन तास शिवाजी पार्क, कॅडेल रोड – रस्ता फुटेल तसा भटकत होतों–दीड वाजतां माहीम बीचवर चंपक पटेल-च्या घरीं जाऊन त्याचं दार ठोठावलं.

मिराः— मग ?

अमृतः– तूं आधीं चहा करून आण बघूं–रागावूं नकोस, मिरा. तुला सर्व कांहीं सांगतों. पण आतां ताबडतोब चहा पिऊन मला कामाला लागलं पाहिजे.

मिराः– आतां कसलं काम करणार ?

अमृतः— तूं आधीं चहा करून आण.

मिराः– बरं, बाबा–( *ती आंत जाते. अमृत उठतो आणि टेबलाशीं जाऊन कागद, दौत, लेखणी, वगैरे लिहिण्याचें सामान बाहेर काढूं लागतो. सामान टेबलावर ठेवून थोडा वेळ खिडकीकडे जाऊन येतो. खुर्चीवर बसून लिहिण्याचा प्रयत्न करतो; पण त्याचें लक्ष लागत नाहीं. पुन्हां उठतो, पुन्हां बसतो. कागदाकडे टक लावून पहातो. उठून येरझाऱ्या घालतो. कांहीं तरी निश्चय करून लिहायला बसतो. पांच दहा ओळी खरडतोही. पुन्हां थांबतो आणि लिहिलेला कागद फाडून टाकतो. दुसरा कागद लिहायला घेतो. चार ओळी लिहून तोही फाडून टाकतो. मिरा येते–* )

मिराः– आत्तां होईल चहा.

अमृत:– काय ग, माझा तो लाल मफलर मिळाला का? माझा घसा पुन्हां दुखूं लागलाय्—

मिरा:– काल शोधला मी थोडा वेळ–पुन्हां बघतें आणखी कुठं आहे का. मला वाटतं, परवां घाटकोपरहून आपण सामान हालवलं तेव्हां कुठं तरी तो हरवला असावा. सगळे कपडे पुन्हां एकदां बाहेर काढून पहातें–

अमृत:– नको; इतकी कांहीं जरूरी नाहीं.

मिरा:– पण एखादी वस्तु हरवली नी सांपडेनाशी झाली कीं मला अगदीं चिडल्यासारखं होतं –

अमृत:– तुझ्या नेहमींच्या संवयीप्रमाणें त्याच्यावर माझी इनिशियल्स ' ए. जे. ' तूं शिवली असशीलच. मग झालं तर–हरवायची धास्तीच नको–होय ना ? कपडे हरवूं नयेत म्हणूनच प्रत्येक फाटक्या-तुटक्या फडक्यावर तूं नांव शिवून ठेवायचीस कीं नाहीं ? अं ?– पडला असेल कुठं मफलर तर माझी ' इनिशियल्स वाचून ' ज्याला सांपडेल तो देईल आणून ! काय ?

मिरा:– ( *विचार करीत* ) कुठं पडला असेल ? पडला कुठं असेल ?

अमृत:– जाऊं दे ग–त्याचा कसला एवढा विचार करतेस ! चहा आण तूं– ( *ती आंत जाते. तो एक कागद घेऊन लिहिण्याचा प्रयत्न करतो. चार ओळी लिहून फाडून टाकतो. ती चहाचा ट्रे घेऊन येते.* )

मिरा:– काय होतंय तुला, अमृत ? तुझा चेहरा इतका चमत्कारिक दिसतोय्. काहीं तरी होतंय तुला. सांग ना मला. (*किंचित थांबून*) हें लिहायला काय घेतलंयस ?

अमृत:– पार्टी-कमिटीसाठीं एक रिपोर्ट तयार करायचाय्. पटेल म्हणाला, कमिटी तुला एक सविस्तर रिपोर्ट लिहायला सांगणार आहे.

मिरा:– कसला रिपोर्ट ? ( *त्याच्याकडे कांहीं वेळ पहात* ) रिपोर्ट लिहिणं इतकं कठीण वाटतं तुला ?

अमृत:– ( *फाडून खालीं फेंकून दिलेल्या कागदांकडे बोट करून* ) ते पहा, आतांपर्यंत चार वेळां सुरवात केली नी मी चार वेळां कागद फाडून टाकले.

मिरा:— आतांपर्यंत तूं कितीतरी रिपोर्ट लिहिले आहेस — आत्तांच का एवढं कठीण वाटतं तुला ?

अमृत:— रिपोर्ट खूप लिहिलेत. पण अशा प्रकारचा रिपोर्ट लिहिण्याची पाळी कधीं आली नव्हती.

( *टेबलावरलें लिहायचें सामान बाजूला सारीत* )

छे: ! आपल्याला नाहीं जमायचं. (*उठून*) नाहीं होणार माझ्यानं — (*थोडा वेळ स्वस्थ उभा राहातो. नंतर तिच्याकडे वळून*) काल रात्रीं कित्येक मैल मी चाललों असेन, — सारखा विचार करीत होतों. काय झालं असेल याची स्पष्ट कल्पना करण्याचा प्रयत्न करीत होतों. पोलिसांनीं पकडलेल्या त्या कापडविक्यानं काय सांगितलं तें तुला आठवतं ना ? — कुणातरी स्त्रीची आकृति असावी असं तो म्हणाला; होय ना ?

मिरा:— मग ?

अमृत:— समजा, तो खरं बोलत असला — खरोखरच ती आकृति स्त्रीची असेल — तर एकंदर काय प्रकार घडला असावा यासंबंधीं माझी एक कल्पना आहे. आपणां सर्वांना चांगलीच ओळखत असलेली, — आपल्या पार्टीच्या सर्व हालचालींची खडा न् खडा माहिती असलेली ती स्त्री असली पाहिजे. हीच बाई सुंदरलालला आमच्या पार्टीची गुपितं वेळोवेळीं सांगत असावी.

मिरा:— तुझ्या या कल्पनेला काडीचा तरी आधार आहे का ?

अमृत:— तें कांहीं असो - मला असं वाटतं खरं. शेवटीं सुंदरलालचं नी तिचं कशावरून तरी भांडण झालं असेल किंवा आपल्या विश्वासघातकी कारवाया आतां फार दिवस छपून राहूं शकणार नाहींत अशी तिला भीति वाटली असेल—

मिरा:— अरे, पण—

अमृत:— रात्रीं पटेलला माझी ही कल्पना मी स्पष्टपणें सांगितली.

मिरा:— पटेलला सांगून सुद्धां टाकलंस हें ?

अमृत:— अर्थात्. पटेल आमच्या पार्टीकमिटीचा उपाध्यक्ष आहे.

त्याला सर्व कांहीं सांगितलं म्हणजे माझ्या संबंधींचा पार्टीचा संशय दूर व्हायला थोडी मदत होईल असं मला वाटलं.

मिरा:– मग तो काय म्हणाला ?

अमृत:– कांहीं नाहीं. कालची पटेलची वागणूक एकदरींत चमत्कारिकच होती. (*रागानें*) मला बससुद्धां म्हणेना पहिल्यांदा—

मिरा:– पण त्या स्त्रीसंबंधींची तुझी कल्पना तूं त्याला सांगितलीस तेव्हां तो काय म्हणाला तें सांग ना—

अमृत:– माझी कल्पना ऐकून घेतल्यानंतर थोडा वेळ तो विचारांत पडल्यासारखा दिसला नी मग एकदम माझ्याकडे वळून म्हणतो काय, ‘जाधव’– जाधव बरं का ! आतांपर्यंत कध्धीं त्यानं मला आडनांवानं हांक मारली नव्हती –‘जाधव, तुझी ही कल्पना बहारदार आहे बुवा. बाकी आत्मसंरक्षणाचा प्रश्न आला कीं, माणसाला काय कल्पना सुचतील त्याचा नेम नाहीं म्हणा ! माणसाच्या स्वतःच्या जीवावर बेतली कीं त्याची कल्पनाशक्ति मोठी तीव्र होते यांत शंका नाहीं !’ असं म्हणून माझ्याकडे अर्थपूर्ण दृष्टीनं पहात त्यानं असं कांहीं चमत्कारिक हास्य केलं म्हणून सांगू –

मिरा:– काय हलकट माणूस तरी !

अमृत:– नंतर शिक्षा सांगणाऱ्या न्यायाधीशाच्या स्वरांत त्यानं मला फर्मावलं कीं, ‘या सुंदरलाल खून प्रकरणासंबंधीं तूं एक सविस्तर रिपोर्ट तयार करावास अशी कमिटीची इच्छा आहे. उद्यां दुपारपर्यंत रिपोर्ट मिळाला पाहिजे. तोंपर्यंत तूं कुठं बाहेर जाऊं नकोस.’

मिरा:– हा जुलूमच झाला म्हणायचा ! मग तूं काय म्हणालास ?

अमृत:– पहिल्यांदा माझ्या तोंडांतून शब्दच बाहेर पडेना – मी सर्दच झालों. मग मात्र मला चीड आली. सर्वांना सोडून कमिटीनं या भानगडीसंबंधीं मलाच रिपोर्ट तयार करायला कां म्हणून सांगावं ? मी म्हणालों.

मिरा:– त्यावर काय म्हणाला पटेल ?

अमृत:– त्यानं नुसतं हंसून माझ्याकडे पाहिलं. माझ्यावर कशाला रागावतोस ? तो म्हणाला. पार्टीकमिटीची आज्ञा पाळायची असेल तर

पाळ. तुम्ही सर्व चोर आहांत, मी चिडून म्हणालों. मग तोही चिडला. आणि मग खरं सगळं बाहेर आलं–

मिरा:– काय ?

अमृत:– कमिटींतल्या सर्व सभासदांना, – पटेललासुद्धां – खात्रीपूर्वक वाटतं कीं, सुंदरलालचा खून मींच केला असावा !

मिरा:– शक्य नाहीं. असं कसं वाटेल त्यांना ? शक्यच नाहीं ! ( *ती उठून खिडकीकडे जाते. पुन्हां अमृतजवळ येऊन* ) पण पोलिसांनीं हा जो पकडलाय् माणूस त्याचं काय ?

अमृत:– आपण खून केला नाहीं हें तो पुन्हां पुन्हां जीव तोडून सांगतोय्. पटेलच्या मतें पोलिसांनाही आतां तसंच वाटूं लागलंय् –

मिरा:– तो नाहीं म्हणतो म्हणून कांहीं त्यानं खून केला नाहीं हें सिद्ध होत नाहीं.

अमृत:– पोलिसांनीं त्याला सोडूनही दिला म्हणे !

मिरा:– म्हणजे ?

अमृत:– म्हणजे काय ? त्यांचं बरोबरच आहे. उगाच त्याला अडकवून ठेवायचा नी कोर्टांत खटला उभा राहयला कीं, न्यायाधीशानं त्याला निरपराधी म्हणून सोडून द्यायचा ! त्यापेक्षां—

मिरा:– मात्र पोलिसांची कमाल आहे म्हणायची – तो निरपराधी आहे याची पुरेपूर खात्री व्हायच्या आधीं त्याला सोडून दिला याचा अर्थ काय ?

अमृत:– अग, पण त्यांची खात्री झाली असेल ना, – तुला काय माहीत ?

मिरा:– मला नाहीं वाटत खात्री झाली असेल असं – आयता एक माणूस सांपडला होता त्याला सोडून द्यायचा यांत कुणाचाच फायदा नाहीं. निदान तो अटकेंत होता तोंपर्यंत तूं तरी अधिक सुरक्षित होतास ! समजा, तो जर कोर्टांत दोषी ठरला असता तर त्याला किती शिक्षा झाली असती रे ?

अमृत:– त्याच्याविरुद्ध तसा पुरावा थोडा होता – फार तर पांच-दहा वर्षं –

मिराः– पांचदहा वर्षंच ?

अमृतः– वीस वर्षं–जन्मठेप झाली असती–पण आम्ही मात्र तेवढ्यावर सुटणार नाहीं – आम्हांला लटकावंच लागेल !

मिराः– इश्श ! असं कांहीं तरी बोलूं नकोस – कशाला कांहीं नाहीं, नी उगाच काय ?

अमृतः– कशाला कांहीं नसो म्हणजे झालं ! – बाकी मला मोठी गंमत वाटते कांहीं गोष्टींची. एखाद्या माणसाला आपण मारे खुनी किंवा गुन्हेगार ठरवतों, त्याचा अर्थ तरी काय ? समाजांतल्या बहुमताला जें बरं वाटत नाहीं तें तो करतो, एवढंच कीं नाहीं ? तेंच बहुमत उद्यां बदललं कीं तीच गोष्ट एकदम चांगली ठरते. काल खुनी बंडखोर ठरलेले लोक आज एकदम राष्ट्रपुरुष, वीर-शिरोमणि ठरतात ! राजकारणांत तर आपण हें नेहमींच पहातों.

मिराः– पुरे झाली तुझी ती तात्त्विक चर्चा ! राहून राहून एकच गोष्ट पुन्हां पुन्हां माझ्या मनांत येते–समजा, त्या माणसावर खटला सुरू झाला – तो कदाचित् निर्दोष असेलही; पण त्याला तें सिद्ध करतां येईल का ?

अमृतः– तो खरोखरच निरपराधी असेल तर त्यानं आणखी सिद्ध काय करायचं ?

मिराः– मग तो सुटेल असं वाटतं तुला ?

अमृतः– मला काय वाटणार ? तुला काय वाटतं, तो दोषी ठरला तर मी सुटेन म्हणून तो दोषी ठरावा असं मला वाटावं ? तो खरोखरच निरपराधी असेल, तर तो बिचारा सुटून जावा असंच मला वाटतं–

मिराः– भलत्याच उदार अंतःकरणाचा आहेस तूं, अमृत.

अमृतः– मला वाटतं, इतका उदारपणा प्रत्येकाच्या अंतःकरणांत असतो.

मिराः– भ्रम आहे तुझा. इतकं औदार्य दाखवणारे फार थोडे. तुला त्या माणसाबद्दल इतका आपलेपणा वाटायचं कांहींच कारण

नाहीं – तुला एवढं कसं कळत नाहीं, अमृत ? तो सुटला तर तूं नक्की नाहीं कां सांपडत ?

अमृतः– मग ?

मिराः– मग काय ? मला तूं हवायस. जगाचं काय होत त्याची मला पर्वा नाहीं.

अमृतः– तुझं म्हणण तरी काय ? त्या बिचाऱ्या माणसाला मीं कधीं पाहयलेला नाहीं, कीं त्याचं नांव सुद्धां ऐकलेलं नाहीं. त्या माणसासंबंधीं मी कांहीं–कांहींच बोलूं शकत नाहीं. मी जो पार्टी-कमिटीसाठीं रिपोर्ट लिहिणार आहें त्यांत फक्त माझा या भान-गडीशीं कसा कांहींच संबंध नाहीं किंवा कांहीं संबंध असूं शकत नाहीं, तेवढंच सांगणार आहें.

मिराः— तें ठीक आहे; पण तुझ्यावरचा संशय साफ उडवून द्यायचा असेल तर त्याला एकच उपाय आहे.

अमृतः– काय ?

मिराः— दुसऱ्या कुणाचं तरी–

अमृतः– दुसऱ्या कुणाचं तरी काय ?

मिराः– दुसऱ्या कुणाचं तरी नांव सुचवायचं—

अमृतः– मिरा-मिरा, तुझं काय डोकं फिरलंय कीं काय ?

मिराः– तुला वांचवण्याकरतां काय वाटेल तें करावसं वाटतं मला !

अमृतः– मला वांचण्याकरतां ? कुणातरी निरपराधी माणसाला बळी देऊन मी जगूं ? स्वतःची कातडी बचावण्याकरतां असलं नीच कृत्य मी करूं ? मग जगून तरी करायचं काय ?

मिराः– काय करावं तेंच मला समजत नाहीं. तूं त्यांना खरं तेंच सांगणार हें कबूल; पण त्यावर ते विश्वास ठेवतील, असं मला मुळींच वाटत नाहीं. खरं सांगून काय होणार तुझा फायदा ? ते तुला पार्टीतून काढून टाकतील झालं !

अमृतः– काढून नाहीं टाकायचे–पार्टी माझं काय करणार तें मला कळलंच आहे.

मिराः– काय ?

अमृत:– मीं गोव्याला पळून जावं, नी ते परत ये म्हणेपर्यंत तिथंच राहावं, हेंच पार्टी सांगणार. जिवंत मृत्युच तो!

मिरा:– ( *डोळ्यांत आंसवें आणून* ) मला नको तो वनवास! मी नाहीं तिकडे दिवस काढू शकायची.

अमृत:– तूं तिथं आलंच पाहिजे असं कुठं आहे?

मिरा:– ( *हुंदके देत* ) मी नाहीं तुला सोडून एकटी रहायला कुठं तयार.

अमृत:– माझ्याशिवाय एकटी रहायची तुला आतां संवय केली पाहिजे.

मिरा:– ( *एकदम कांहींतरी निश्चय करून* ) मी देतें तुला रिपोर्ट लिहून.

अमृत:– रिपोर्ट कशासंबंधीं आहे तुला माहीत आहे ना?

मिरा:– सुदरलाल – प्रकरणासंबंधीं.

अमृत:– मग तुला काय माहिती आहे सुंदरलालच्या खुनासंबंधीं?

मिरा:– तुला तरी कुठं काय माहिती आहे? मग मीं लिहिला तर काय झालं?

अमृत:– हा खून कुणी कसा केला असावा यासंबंधीं माझ्या डोक्यांत कांहीं कल्पना तरी आहेत.

मिरा:– पण तुला प्रत्यक्ष माहिती अशी कांहींच नाहीं.

अमृत:– माहिती असो अगर नसो, पार्टीसाठीं रिपोर्ट लिहिला पाहिजे आणि तो मींच लिहिला पाहिजे एवढं खरं.

मिरा:– कां म्हणून तूंच लिहिला पाहिजेस?

(*टेलिफोन वाजतो.*)

अमृत:– (*उठून टेलिफोन घेतो*) हो – हो – मी अमृत – यस् जाधव. कोण? हं – पटेल होय? बरं बरं – (*एकदम भराभर बोलूं लागतो*) कमिटीचा अगदीं धीर सुटला कीं काय? तो रिपोर्ट मिळाल्याशिवाय श्वासही सोडणं कमिटीला अशक्य झालेलं दिसतंय! –त्या रिपोर्टसाठीं अगदीं दोन्ही हात पसरून बसलेत का सर्व सभासद कमिटीचे! – का तुला आपल्या मित्राला पांच पांच मिनिटांनीं टेलिफोन केल्याशिवाय

अमृतः- कांहीं झालं तरी त्याचा उपयोग काय आतां ? बरं बोल; काय बोलायचं असेल तें बोलून टाक - घेतों ऐकून-

मिराः- अमृत, - आत्तां या क्षणापर्यंत मी तुझं सर्वस्व होतें - माझ्या-वर तुझा पूर्ण विश्वास होता. आणखी दहाच मिनिटं - फक्त दहाच मिनिट तुझी पूर्वींचीच मिरा बोलते आहे एवढा विश्वास धर - मग - माझं काय वाटेल तें कर. घरदार, गणगोत, नातंपातं सोडून मी तुझ्यामागून आलें - तुझ्यावर प्राणाहूनही इतकीं वर्ष प्रेम केलं-एवढी भिक्षा घालच मला.

अमृतः- क्षमा कर मला. मी काय बोलतोंय - काय करतोंय् तें माझं मलाच समजत नाहीं - होय - होय - तूं माझं सर्वस्व होतीस-तुझ्यावर माझा पूर्ण विश्वास होता - घरदार, आईबाप, गणगोत, सर्वा-वर तूं माझ्यासाठीं पाणी सोडलंस. या क्षणापर्यंत तू आणि मी, मी आणि तूं, हा भेदच नव्हता - पण आतां - आतां - कांहींच उरलं नाहीं - शून्य - सर्व शून्य झालंय् !

*( कोचावर गळून पडतो. )*

मिराः- शून्य कसं ? सत्याची तर तुला कदर आहे ना ?

अमृतः- सत्य ? सत्यानंच तर माझा सत्यानाश केलाय् !

*( मिरा त्याच्या पायाकडे जाऊन बसते. )*

मिराः- सुंदरलालचीं अनेक स्त्रियांशीं लफडीं होतीं असं तूं काल म्हणत होतास - अगदीं खरं आहे तें - अनेक स्त्रियांना त्यानं अनेक कारणांनीं हाताशीं धरल होतं - त्या अनेक स्त्रियांपैकीं मीही एक होतें. *(ती खालीं पहात बोलते. )*—

*—— माझ्या वडिलांचा मित्र म्हणून नागपूरला तो आमच्या घरीं येत असे - आम्ही त्याला सुंदरकाका म्हणत असूं - आपलं लग्न झालं नी आपण घाटकोपरला रहायला आलों तेव्हां तूं घरीं नस-तांना तो एकदां मला मुद्दाम भेटायला आला - तुला नोकरी नव्हती - घरचीं माणसं आपलं तोंड पहायला तयार नव्हतीं - काम-गार चळवळींतल्या एका भाईची बायको म्हणून ओळखी-पाळखीच्या बायकाही माझ्याशीं फारसा संबंध ठेवायला तयार नव्हत्या. मला*

*अगदीं एकटं एकटं वाटे. कधीं कधीं मी रडकुंडीला येई – अशा वेळीं एवढे मोठे लक्षाधीश सुंदरकाका आठवणीनं एका मोडक्या चाळींत मला भेटायला आले तेव्हां मला बरं वाटलं – त्या वेळीं सुंदरलाल इतकं गोड बोलला - इतक्या गोड रीतीनं वागला कीं भांडवलवाला म्हणून तूं त्याला उगाच वेळीं अवेळीं शिव्या देतोस असं मला वाटलं. तुला एक नोकरीही पाहून द्यायचं त्यानं मला वचन दिलं – घाट-कोपर फॅक्टरींत असिस्टंट केमिस्ट म्हणून पाऊणशें रुपयाची नोकरी तुला सुंदरलालमुळंच मिळाली –*

अमृतः– काय ?

मिराः– हो, त्यानं मालकाजवळ बोलून ठेवलं होतं – नंतर मी तुला तिथं नोकरी मिळते का जाऊन पहा म्हणून सांगितलं. सुंदरलालचं मीं नांवही काढलं नाहीं – त्याच्यामुळं नोकरी मिळतेय हें कळलं असतं तर तूं ती नोकरी धरणं शक्य नव्हतं, याबद्दल माझी खात्री होती; नी आपली तर त्या वेळीं अन्नान्न दशा होती. तू तिथं गेलास नी तुला ती नोकरी मिळाली. तूं मोठ्या आनंदानं त्या दिवशीं नोकरी मिळाली म्हणून मला सांगायला आलास –

अमृतः– म्हणजे सुदरलालच्या कृपेनं मी अन्नाला लागलों !

मिराः– अमृत !

अमृतः– आतां स्पष्ट बोलायला कशाला लाजायचं ?

मिराः– पण –

अमृतः– पणबीण कांहीं नाहीं – त्या मांगाच्या हातांत तूं माझी मुंडी दिलीस ! तरीच तो हरामखोर –

मिराः– काय ?

अमृतः– एकदां संपकमिटीचा अध्यक्ष म्हणून कामगारांचं शिष्ट-मंडळ घेऊन मी त्याच्या मुलाखतीला गेलों होतों – तुम्हां भांडवल-वाल्यांकडून मेहेरबानी म्हणून आम्हांला एक कवडीही नको असं मी म्हणालों – तेव्हां माझ्याकडे पाहून त्यानं असं कांहीं चमत्कारिक हास्य केलं – त्या वेळेला मला त्याचा अर्थच कळला नाहीं – आतां कळलं सारं – तूं – तूं माझा सत्यानाश—

मिरा:– अमृत, आधीं माझं सर्व म्हणणं ऐकून तरी घे—

अमृत:– खूप ऐकलं आतांपर्यंत – आतां आणखी कांहीं ऐकायची इच्छा नाही–

मिरा:– सबंध सत्य ऐकून घेण्याची तुझी इच्छा नाहीं –

अमृत:– ऐकल तेंच पुरेसं झाल – आणखी सबंध सत्य काय करायचंय ?

मिरा:– नाहीं – नाहीं – वेळ भरत चालली. मला सर्व सांगितलच पाहिजे – सांगितलंच पाहिजे मला, अमृत.

अमृत:– ठीक आहे – बोल.

मिरा:– तुला नोकरी मिळाली तेव्हां मला फार आनंद झाला. राजकारणांत तुझा नी त्याचा कितीही विरोध असला तरी सुंदरलाल हा एक भला माणूस आहे अस मला वाटूं लागल. तू नसतांना पुष्कळ वेळां तो मला घरीं भेटायला यायचा. तुझा नवरा भडक आहे, मी इथं आलेलं त्याला आवडायचं नाहीं, म्हणून तो नसतांना मी येतों असं तो म्हणायचा. मी त्याला एक माहेरचा माणूस समजायची नी मलाही त्याचं कांही वाटायचं नाहीं – एकदां तूं बाहेरगांवीं असतांना तो घरीं आला. त्या दिवशीं संध्याकाळीं सी. सी. आय्. क्लबमध्यें आपल्याबरोबर जेवायला चल, असा त्यानं मला आग्रह केला. मी खूप नाहीं म्हटलं, आढेवेढे घेतले; पण तो ऐकेचना. तुझ्या वडिलांचा मी मित्र – तुझ्या काका-सारखा मी – माझ्याबरोबर एकदां आलीस तर काय झाल म्हणून तो मुळींच ऐकेना. सी. सी. आय्. चीं वर्णनं मीं ऐकलीं होतीं – सुंदर कपडे घातलेल्या स्त्रिया – सुग्रास अन्न– कित्ती वर्षांत मीं चांगलंसं हॉटेल नी सुंदर कपडे पाहिले नव्हते. तूं घरीं नसल्यामुळं मला अगदीं एकटं एकटं वाटत होतं – मला मोह आवरला नाहीं –

अमृत:– तू गेलीस सी. सी. आय्. मध्यें त्याच्याबरोबर ?

मिरा:— हो– तूं मला नेहमीं, ‘तुला कुठं जायला नको. कुणांत

मिसळायला नको. वर वर तूं किती दाखवलंस तरी मनांतून अजूनही जुनाटच आहेस, असं म्हणायचास !'

अमृत– तरीच–

मिरा:– होय. म्हणूनच परवां सी. सी. आय्. संबंधीं तूं बोलत असतांना तुझी चूक मीं चट्कन् दाखविली नी नंतर जीभ चावली. तिथं त्यानं मला अगदीं नको होईपर्यंत खाऊ घातलं. नंतर एक छानदार कांहीं तरी पेय त्यानं मला प्यायला दिलं. मला वाटत, त्यांत त्यानं माझ्या न कळत कांहीं तरी औषध टाकल–मल सारखी गुंगी येऊं लागली–पुढं घरीं मी कशी आलें, कधीं आलें, मला काहींच आठवत नाहीं. तेव्हांपासून–त्या रात्रीपासून माझं हें भयंकर, यातनामय दुहेरी जीवन सुरू झालं–

अमृत:– म्हणजे त्यानं–

मिरा:– नाहीं, माझ्या शरीराची तशी त्यानं कांहींच विटंबना केली नाहीं. त्यानंतरही त्यानं मला कधीं स्पर्श केला नाहीं. पण शारीरिक विटंबनेपेक्षां भयंकर–आमरण माझा पिच्छा पुरवील अस एक दुर्धर पाप त्यानं माझ्या मागं लावून दिलं ! शरीर भ्रष्ट झालं असतं तर माझ्या मनाच्या यातना मलाच एकटीला सहन कराव्या लागल्या असत्या; पण त्यानं तसं कांहीं केलं नाहीं. त्यानं तुलाही त्या जाळ्यांत अडकवून घेतला. तुझा पुरा विध्वस–

अमृत:– माझा काय संबंध त्यांत ?

मिरा:–तेंच तर भयंकर आहे. तो किती भयंकर माणूस होता हें दुसऱ्या दिवशीं मला कळलं. आपल्या घरीं मला नेऊन त्या बेशुद्ध स्थितींत माझं डोकं आपल्या खांद्यावर ठेवून त्यानं दोघांचा एक फोटो काढून घेतला. नंतर मला तो वाटेल तेव्हां भेटायला यायचा–माझं तुझ्यावर निरतिशय प्रेम आहे हें त्याला माहीत होतं – सध्यां तुमच्या पार्टीचे काय बेत चालले आहेत, – उद्यां तुझा नवरा कुठं बोलणार आहे – संप किती

चैन पडत नाहीं ?– माझा वियोग अगदीं सहन होत नसेल तुम्हांला ?– काय म्हणतोस ? हं–अस्सं ? माझ्याच जगण्याचा किंवा मरण्याचा प्रश्न, आहे ना ? माझ्याच जिवाचं मला विशेष कांहीं वाटत नाहीं काय ? हो–हो–सांग ना टेलिफोनवर–काय पोलिसांना एक मफ्लर सांपडलाय् !

(*मिरा एकदम उठून उभी रहाते नी बाजूला जाऊन डोकें हातांत धरते.*) हं–मग छानच ! आतां मफ्लरवाला कुणीतरी शोधून काढायची खटपट करतील पोलीस. मी ठीक आहें–अगदीं ठीक ! त्याची काळजी नको तुम्हांला–रिपोर्ट ना ?–हो. रिपोर्ट होईल तयार संध्याकाळपर्यंत–तूं येणार आहेस इकडे ? खुशाल ये. बरं –बरं– ( *टेलिफोन खालीं ठेवतो मिरा त्याच्याजवळ येते.* )

मिरा:– ( *ती थरथर कांपते आहे.*) पोलिसांना मफ्लर सांपडलाय् ?

अमृत:– ( *तिच्याकडे वळून* ) हो म्हणे ! त्या दिवशीं संध्याकाळीं मी मफ्लर घालून गेलों नव्हतों. पण बहुतेक माझा हरवलेला मफ्लरच त्यांना मिळाला असेल ! तेवढंच बाकी होतं ! माझं नशीब मोठ शिकंदर आहे; नाही, मिरा ? (*हंसतो. मिरा भीतिग्रस्त डोळ्यांनीं त्याच्याकडे पहाते.* ) पोलिसांना सांगूं का टेलिफोन करून की माझा एक मफ्लर हरवलाय म्हणून ? ( *ती बोलण्याचा प्रयत्न करते; पण तिच्या तोंडांतून शब्द फुटत नाहीं. ती मानेनें नको म्हणते.* ) कां ग–कां नको ? माझाच असेल तर आयताच सांपडला म्हणायचा !

मिरा:– नको–नको रे–स्वतःचा घात करून घेऊं नकोस.

अमृत:– अग, पण कां नको ? माझा मफ्लर हरवलाय–पोलिसांना सांपडलाय. माझाच असला तर मीं तो परत घेणं योग्य नाहीं का ?

मिरा:– माझ्या गळयाची शपथ आहे तुला, अमृत. तूं या मफ्लरची गोष्ट कुठंहि बोलतां कामा नयेस.

अमृत:– ( *तिचे दोन्ही दंड धरून तिला कोचावर बसवीत* ) कां बोलूं नको ? मिरा, खरं सांग मला काय तें–काय रहस्य आहे हें ? सुंदरलालचा खून झाला त्याचं तुला विशेष कांहीं वाटायचं कारण नाहीं. माझी पार्टी, माझे मित्र माझ्यावर उलटताहेत. त्यांतही कांहीं

विशेष नाहीं. हें नेहमींचंच आहे. पोलिसांना एक मफ्लर सांपडला,– असेल सांपडला. त्याचंही आपल्याला विशेष वाटायचं कांहीं कारण नाहीं. मग तूं अशी गोरीमोरी, पांढरी फटक कां पडतेस ?

मिरा:– (*हुंदके देत*) तो मफ्लर त्यांना मिळायला नको होता.

अमृत:– (*तिचे दंड धरून तिला हलवत*) कां नको होता मिळायला मफ्लर ?

मिरा:– (*खोल आवाजांत*) तो–तो तुझा असला पाहिजे मफ्लर.

अमृत:– माझा ? माझा कसा असेल तो ? त्या दिवशी मी मफ्लर मुळींच घेतला नव्हता बरोबर. सुंदरलालचा खून झाला त्या ठिकाणीं माझा मफ्लर कसा जाईल ?

मिरा:– तोच असला पाहिजे तो !

अमृत:—पण पोलिसांना सांपडलेला मफ्लर पहायच्यापूर्वी तूं अशी बोलतेस कशी ? (*ती कांहीं बोलणार तोंच*) पाहूच या तो मफ्लर कसला आहे तो. (*तो टेलिफोनकडे जाऊन एक नंबर घेऊं लागतो. मिरा सारखी हुंदके देत आहे.*) गप्प रहा. गप्प रहा म्हणतों ना–हलो–हलो– (*टेलिफोन जोरानें हालवीत*) हलो–पटेल का ? पटेल, मी अमृत बोलतोंय्. पोलिसाना एक मफ्लर मिळालाय् असं मघाशीं तूं काहीं म्हणालास ना ? हं. तो–मफ्लर कसला आहे, कसल्या रंगाचा आहे, कांहीं कळलय का तुला ? नाही ? फक्त मफ्लर आहे इतकंच ? बर–नाहीं. (*निश्चयपूर्वक*) सांगतोंच तुला काय तें. (*मिरा एकदम धांवत जाऊन त्याला अडवते.*)

मिरा:– अमृत, नको – नको, अमृत –

अमृत:– (*तिला बाजूला ढकलून, टेलिफोनमध्यें*) हें बघ, पटेल माझा एक मफ्लर हरवलाय – हो – कालपासून सांपडत नाहीं – मला वाटतं तो कुणी तरी चोरून नेलाय् – या खुनाच्या लफड्यांत मला पक्कंच गुंतवण्याचा कुणाचा तरी कट दिसतोय् – (*मिरा आंत निघून जाते.*) पोलिसांना अगोदर तो सांपडला नाहीं, हें मोठं आश्चर्य आहे – काय ? अगोदर सांपडला होता – पण ते मुद्दाम, बोलत नव्हते ? कुठं ?– हं – हं – त्याची अंगठी, पाकीट, घड्याळ

पुरून ठेवलं होतं तिथं सांपडला – आय् सी ! अच्छा – ( *टेलिफोन खालीं ठेवून क्षणभर तिथेंच उभा रहातो. नंतर तिथून दुसरीकडे जातो. मिरा येते. तिच्या हातांत एक पांढरा मफ्लर आहे. तो टेबलावर ठेवते आणि त्याच्याकडे पहात रहाते. तो येरझाऱ्या घालीत असतां टेबलाकडे येऊन थबकतो. मफ्लर उचलून घेतो.* )

अमृतः– हा इथं कसा आला ?

मिराः– तुझा तो लाल मफ्लर शोधीत असतांना हा सांपडला मला कपाटांत.

अमृतः– हा मी कधींच वापरीत नव्हतों. ( *तो उलगडून वर खालीं पहातो.* ) हरवलाय तो माझा लाल मफ्लर ना ?

मिराः– होय.

अमृतः– हीं पहा तूं शिवलेलीं 'ए. जे.' अक्षरं इथंही आहेत. ठीक ! छान ! म्हणजे पोलिसांना तो लाल मिळाला असेल आणि 'ए. जे.' चा अर्थ काय याबद्दल यत्किंचित् शंका असेल तर त्यांनीं इथं येऊन हा पहावा नी या अक्षरांचं जसंच्या तसं वळण नी तेंच काळं रेशीम पाहून स्वतःची शंभर टक्के खात्री करून घ्यावी ! माझा लाल मफ्लर चोरून नेणारा चोर कुणीही असो, नी त्याचा हेतु कांहींही असो; पण तो विलक्षण डोक्याचा आहे यांत शंका नाहीं. त्यानं डाव अगदीं बेमालूम टाकलाय् ! ( *मफ्लर खालीं भिरकावून देतो. पिंजऱ्यांतल्या सिंहासारखा इकडे तिकडे फिरतो. वेड्यासारखे डोळे फिरवीत* ) तुझ्या वडिलांचं तें भरलेलं पिस्तूल या ट्रंकेंतच आहे; नाहीं का ? ( *धाड्कन् ट्रंक उघडून पिस्तूल बाहेर काढतो.* )

मिराः– अमृत, अमृत – अरे !

अमृतः– शट् अप् ! हा कोण चोर आहे तो मला शोधून काढलाच पाहिजे. बाजूला हो तूं.

मिराः– भलतंच काय, अमृत.

अमृतः– बाजूला हो तूं. नाहींतर तुझ्यावर गोळी झाडीन—

मिराः– खुशाल झाड हवी तर. पण असाच बाहेर जाऊं नकोस–

झाड माझ्यावर गोळी. आणखी एक गोळी कमी होईल. दुसरं कांऽऽहीं होणार नाहीं.

अमृत:– आणखी एक गोळी ? म्हणजे ?

मिरा:– ( *शांतपणें* ) कारण एक गोळी मी अगोदरच झाडलेली आहे.

अमृत:– ( *तिच्याकडे डोळे फाडून पहात* ) एक गोळी तूं अगोदरच झाडली आहेस ? तूं ?–गोळी झाडली आहेस ?

( *स्तब्धता. त्याचे हातपाय गळूं लागतात. पिस्तूल टेबलावर ठेवून तो आंत जाऊं लागतो.* )

मिरा:– ( *त्याला दंडाला धरून परत आणीत* ) अमृत, मी काय म्हणतें तें ऐक आधीं.

अमृत:– ( *शून्य दृष्टीनें समोर पहात* ) काय ऐकायचं ? ऐकण्यासारखं काय आहे ? मला कांहीं ऐकायचं नाहीं–मला कांहीं सांगूं नकोस.

मिरा:– ऐकलंच पाहिजे तुला, अमृत.

अमृत:– ( *एकदम* ) तूं आधीं कुठं तरी पळून जा—

मिरा:– अमृत, मी काय म्हणतें तें ऐक आधीं–

अमृत:– या घरांतून–इथून–मी आहें तिथून तूं निघून जा आधीं. जा पळ. जीव घेऊन पळ–

मिरा:– मी कुठ्ठं जाणार नाहीं – तुला सोडून मी कुठ्ठं जाणार नाहीं, अमृत.

अमृत:– माझी शेवटपर्यंत मजा पहायचा विचार आहे वाटतं तुझा ? (*वेड्यासारखा हंसतो.*) माझ्या धिडवड्यांचं नाटक पुरेपूर पहायचं ठरवलंयस् वाटत ? तडफडून तडफडून अगदीं शेवटचा श्वास मी सोडीपर्यंत गंमत पहायचा निश्चय आहे तुझा, होय ?

मिरा:– (*आळवणीच्या स्वरांत*) मला बोलूं तरी दे, अमृत – माझे शेवटचे दोन शब्द तरी तूं ऐकलेच पाहिजेस—

अमृत:– ऐकलेच पाहिजेत ? कां ? एवढा आग्रह कां ?

मिरा:– माझे हेतू तुला समजलेच पाहिजेत. तुझा गैरसमज दूर झालाच पाहिजे—

न्यायाला मरण नाहीं म्हणतात – हाच का तो न्याय ? हेंच सत्य वाटत ?

मिराः– ( *मृदु स्वरांत* ) अमृत, बिचाऱ्या सत्याला नी न्यायाला कशाला दोष देतोस ? मुळांत माझीच चूक नाहीं का ? मीच नाहीं का मोहाला बळी पडलें ?

अमृतः– पण या सांपळ्यांतून कांहींच का सुटका नाहीं, मिरा ?

मिराः– कुठंतरी पळून जाऊं या म्हणतोस ?

अमृतः– ( *निःश्वास टाकून* ) छेः ! त्याचा कांहींच उपयोग नाहीं. कांहीं अपराध नसतां खुनी हा छाप जन्मभर माझ्या डोक्यावर राहील.

मिराः– कदाचित् सुटूंही आपण !

अमृतः– कशीं ?

मिराः– तो मफ्लर तुझाच आहे, हें पोलिसांच्या नाही ध्यानांत यायच एखादे वेळीं.

अमृतः– पण त्यावर 'ए. जे.' हीं अक्षरं ढळढळीत आहेत ना? 'ए. जे.' म्हणजे काय याचा ते विचार करतीलच.

मिराः– मग अजून कां येत नाहीत ते ? एव्हांना यायला हवेत. या कामाला उशीर नाहीं करीत ते.

अमृतः– काय सांगावं तें. कदाचित् नसेल मफ्लर सांपडला त्यांना. पटेलची कांहीं तरी चूक झाली असेल ऐकण्यांत. नाहीं,– तो मफ्लर-च म्हणाला. माझी खात्री आहे. ( *एकदम* ) किती वाजले ? नवाला पांच मिनिटं. आतां बातम्या येतील रेडिओवर. कळेल कांहीं तरी कदाचित्

( *रेडिओ चालू करतो. खट् खर् खर् आवाज होतात. नंतर संगीताचा कार्यक्रम ऐकूं येऊं लागतो – मिरा त्याच्याजवळ जाऊन त्याला बिलगून उभी रहाते.* )

मिराः– किती गोड आहे गाणं, अमृत, नाहीं ?

( *तो तिच्या कमरेभोंवतीं हात घालून तिला अगदीं जवळ घेतो. गाणें थांबतें.* )

अमृतः– मिरा, तूं माझीच – अगदीं सर्वस्वीं माझी आहेस ?

मिराः– तुझीच, – सर्वस्वीं तुझीच, अमृत !

रेडिओः– ऑल इंडिया रेडिओ बातम्या देत आहे – रशियन आघाडी – स्मोलेन्स्कच्या दिशेनें रशियनांनीं आठ मैल प्रगति केली – जर्मनांचे सर्व प्रतिहल्ले त्यांनीं परतवून लावले. पॅसिफिक – न्यू गिनी जवळील ट्रुक बेटावर जपान्यांनीं दोन लक्ष सैन्यांची जमावट केली आहे – काल पोर्ट मोरेस्बीवर झालेल्या हल्ल्यांत आमच्या हरिकेन विमानांनीं जपान्यांचीं छत्तीस 'ओ' विमानें पाडलीं.

मिराः– कंटाळा येतो या ठराविक चऱ्हाटाचा !

अमृतः– अग, हो – हो – आतां येतील स्थानिक बातम्या – ( *रेडिओ चालूच आहे.* )

रेडिओः– एक खास खबर मुद्दाम जाहीर करायची आहे – 'गोल्डन की' आणि 'फोर फेदर्स' हे घोडे आयत्या वेळीं आजारी झाल्यामुळें उद्यांची तिसरी रेस रद्द करण्यांत आली आहे. ( *किंचित् स्तब्धता.* ) सुंदरलाल खून प्रकरण. ( *मिरा व अमृत श्वास धरून ऐकूं लागतात.* )
या प्रकरणांत काल एक नवीनच पुरावा उघडकीस आला. खून झाला त्या ठिकाणाच्या जवळच पोलिसांना एक मफ्लर सांपडला आहे. या मफ्लरच्या आधारानें खुनी माणसाचा तलास लावणें सोपें झालें आहे, असें पोलिसांना वाटतें – सुंदरलाल खुनाचें गूढ हळुहळु स्पष्ट होऊं लागलें आहे. लवकरच कांहीं महत्त्वाची धरपकड होईल. बातम्या संपल्या. या पुढचा कार्यक्रम उस्ताद मखदूमखां यांचें बीनवादन. ( *बीन वाजूं लागतें. अस्पष्ट.* )

मिराः– ( *भयंकर निराशेनें* ) झालं,– संपलं, – इतक्यांत येतील पोलीस.

( *अमृत टेबलावरचें पिस्तूल हातांत घेतो. त्याच्या तोंडावर विलक्षण शांतता दिसते आहे.* )

**अमृतः– ( *तिचा हात धरून* ) ये, मिरा – ये – आतां आपण थोडी विश्रांति घेऊं. ( *ती मागें होते.* ) ये ना. ये, लाडके, असं काय ? आतां**

विश्रांति नको का घ्यायला? ( *ती मागें सरते.* ) नाहीं येणार माझ्या-बरोबर? एकटाच जाऊ मी?

मिरा:– काय करणार तू, अमृत?

अमृत:– कांहींच सुटका नाही का म्हणून मघांशी मी विचारीत होतों, नाहीं का? ( *पिस्तूल दाखवीत* ) ही काय सुटका! किती सुखानं सुटण्याचा मार्ग! तू आणि मी, – मी आणि तू – आपणाला कुणीही आतां दूर करू शकणार नाहीं.

मिरा:– दोघांनीही एकदम–

अमृत:– हो. दोघांनीही,–हातांत हात–गळ्यांत गळा घालूनच आपण दोघं आतांपर्यंत नाहीं का जगलो? मग आता–अजून यांत पांच गोळ्या आहेत, होय ना?

मिरा:– होय.

अमृत:– उभी रहा अशी—

मिरा:–नको,– नको रे अमृत, अजूनही कितीतरी आयुष्य आपल्यापुढं–

अमृत:– ( *वेड्यासारखे डोळे फिरवीत* ) होय. मिरा, अनत, असीम अशाच ठिकाणी आपण जातों आहोंत. तिथ तुला–मला कुणी कांहीं करूं शकणार नाहीं. फक्त दोनच गोळ्या–पहिली तुला,–दुसरी मला. फक्त दोनच क्षण–दोनच क्षण. ( *पिस्तूल निच्यावर रोखून धरतो.* )

मिरा:– ( *त्याच्याकडे रोखून पहात* ) फेंकून दे तें पिस्तूल, अमृत. टाक–टाक खालीं. ( *त्याचा हात कांपतो. त्याच्या हातांतलें पिस्तूल हिस-कावून घेऊन ती बाजूला भिरकावून देते.* ) मी नाही मरणार अशी कुत्र्याच्या मोतीन;– आणि तुलाही मरूं देणार नाहीं.

अमृत:– मग करणार काय तूं?

मिरा:– झगडणार, झुजणार आणि मरायचंच असेल तर झुंझत मरणार! सांपळ्यांत सांपडलेल्या उदरांनी तडफडून तडफडून मराव; माणसांनीं–निदान क्रांतीला जीवन वाहिलेल्या माणसांनीं तरी असं आत्महत्येच्या काळोख्या आडवाटेनें जीवनांतून पळून जाऊन कसं चालेल? क्रांति म्हणजे सत्य आणि न्यायाचा विजय ना? मग सत्य काय आहे

तें जगाला ओरडून सांगतच मी फांसावर चढेन – दुसऱ्या कोणत्याही मार्गांनीं मरण पत्करणं म्हणजे क्रांतीचा विश्वासघात आहे–

अमृतः– पण आपल्या पार्टीचा कितो भयंकर विश्वासघात आपण करीत आलों –

मिराः– आपण नव्हे – मी – मी एकटी – तुझ्याइतकी पार्टीची सेवा-कुणीच केली नसेल. पण पार्टीलाही सत्य कळलंच पाहिजे. माझ्या हातून विश्वासघात घडलेला असला, खून पडलेला असला, कोर्ट-कचेऱ्यांच्या दृष्टीनें मी दोषी ठरत असलें तरी त्याहीपेक्षां उच्च न्यायानें मी निर्दोषीच आहें हें साऱ्या जगाला कळलंच पाहिजे – तुझा मात्र मीं सर्वस्वीं सत्यानाश केला, अमृत –

अमृतः– सत्यानाश ? छे, छे ! मुळींच नाही. मेलेल्या अमृतला तूं पुन्हां जिवंत केलास, मिरा.

मिराः– म्हणजे ?

रेडिओः–(*बीनवादन थांबतें.*) माफ करा हं. सुंदरलाल खुना-बाबत एक महत्त्वाची बातमी पोलीस हेड् क्वार्टर्सकडून आली आहे. (*मिरा आणि अमृत एकदम दचकून पाहतात.*) मयताचें स्वतःचें रिव्हॉल्व्हर घरीं सांपडत नसल्याचें याच्या नातेवाइकां-कडून कळतें. तसंच मयताची डायरी सांपडली आहे, तिच्यांत मृत्यूच्या आदल्याच दिवशीं 'जीव नकोसा झाला आहें,' अशी नोंद दिसते. ही आत्महत्या असण्याचा संभव दिसतो. पोलीस तपास चालू आहे. नमस्ते. ( *संगीत* पुन्हां *चालू होतें.* )

अमृतः– चालू द्या तपास. आम्हांला आतां त्याची मुळींच पर्वा नाहीं. पोलीस येऊं द्यात, राजदूत येऊं द्यात, यमदूत येऊं द्यात–कोण-त्याही प्रसंगाला तोंड द्यायला तुझ्या खांद्याला खांदा लावून तयार आहें मी, मिरा. (*तिचे दोन्ही दंड धरून तिच्या चेहेऱ्याकडे तो अभिमा-नानें पहात राहतो. ती त्याच्या खांद्यावर मान टाकते. रेडिओचें संगीत चढत जातें. तोंच–*

पडदा पडतो. )

तारखेला जाहीर होणार. सर्व सर्व माहिती तो मला विचारायचा–

अमृतः– नी तूं त्याला सांगायचीस !

मिराः– हो; तुझं प्रेम मला गमवायचं नव्हतं–मी जरा कांकूं केलं कीं तो दरडावयाचा, 'हा फोटो तुझ्या नवऱ्याला दाखवला तर तुझं काय होईल तें ध्यानांत आण !' तोही त्याग मीं तुझ्यासाठीं केला असता; पण त्याचा कांहीं उपयोग नव्हता – कारण माझ्यापेक्षांही तुझा विध्वंस करायची धमकी तो घालायचा, 'उद्यां हा फोटो वर्तमानपत्रांत प्रसिद्ध करतों. आपल्या बायकोला भांडवलवाल्याकडे पाठवणारा हा पहा बडा कामगार पुढारी, म्हणून त्याची बदनामी करतों – थोंड मारून तुझ्या अमृतला कामगार आपल्या चळवळीतून हांकलन देतील !' मग – मी सर्व – सर्व सांगायची त्याला—

अमृतः– आमच्या पार्टीचीं सर्व गुपितं सुंदरलालला सांगणारी स्त्री तूं होतीस तर ? माझी,–अमृत जाधवाची बायको माझ्या पार्टीचा, कामगार चळवळीचा विश्वासघात करीत होती !–तूं,–मिरा, तूं–तूं–छेः ! शक्य नाहीं–मी स्वप्नांत आहें–मी स्वप्नांत ऐकतोंय हें सर्व !

मिराः– नाहीं, अमृत,–तूं स्वप्नांत नाहीस. हें सर्व अगदीं खरं आहे–अगदीं एकूण एक खरं. त्या दिवशीं संध्याकाळीं त्याच्या जाळ्यांत माझा एकदां पाय पडला, नी मी गुरफटलें ती कायमचीच गुरफटलें–पण तुझ्यावरल्या निरतिशय प्रेमामुळंच मी हें सर्व केलं – तुझं प्रेम गमावण्याची कल्पनाच मला सहन होईना–

अमृतः– माझ्यावरल्या प्रेमामुळं माझ्या कार्याची नी आयुष्याची धूळधाण केलीस तूं ?

मिराः– कसं समजत नाहीं तुला, अमृत ? स्त्रीच्या प्रेमाची तुला कांहींच कशी कल्पना नाहीं ? आपल्या प्राणप्रिय माणसाच्या प्रेमाला,–नव्हे प्रत्यक्ष त्यालाच पारखं व्हायचं, डोळ्यासमोर त्याचा विध्वंस होऊं द्यायचा की त्याची फसवणूक करायची, अशा आपत्तींत सांपडलेल्या स्त्रीनं करायच तरी काय ? सुंदरलालच्यापुढें किती वेळां मी पदर पसरला,–रडलें –

ओरडले–त्याचे पाय धरले,–त्याच्या पायावर नाक घासलं; पण तो नुसता हंसायचा —

अमृत:– गेलीं कित्येक वर्षं तूं या नरकयातना आंतल्या आंत सहन करते आहेस, मिरा ?

मिरा:– होय. परवां संध्याकाळीं या यातनांतून कायमचं सुटायचा मी निश्चय केला. तें पिस्तूल इथं ठेवून बाबा गेल्यापासून माझ्या डोक्यांत सारखे तेच विचार येत होते. लहानपणींच बाबांनीं मला पिस्तूल वापरायला शिकवलं होतं. कांहीं माहिती पाहिजे असली कीं बहुतेक जंगलांतल्या त्या एकांत जागीं संध्याकाळचा तो मला भेटायला बोलवायचा– मला भेटायला येतांना तरी त्याच्या खिशात तो फोटो नेहमीं असायचा, हें मला माहीत होतं. परवां संध्याकाळीं मी पुरा निश्चय करूनच गेलें. दुसरा मार्गच नव्हता. (*थोडा वेळ थांबून, शांतपणें*) गोळी कानशिलांतून आरपार गेली–त्याला हूं म्हणायची फुरसद मिळाली नाहीं. तो धाड्कन् खालीं पडला. मला जरा भोंवळ आल्यासारखी झाली. पण दुसऱ्याच क्षणाला मला बरं वाटलं–एकदम साफ मोकळी झाल्यासारखं वाटलं–

अमृत:– इतक्या तडकाफडकीं म्हणजे सुखाचंच मरण आलं त्या सैतानाला.

मिरा:– त्याच्या खिशांतून तो फोटो मीं काढून घेतला. इतक्यांत माझ्या डोक्यात एक कल्पना आली. त्याचं पैशाचं पाकीट, अंगठी, घड्याळ, बाजूलाच कुठं पुरून टाकलं तर पोलिसांना चोरीचा संशय येईल नी खरा प्रकार त्यांच्या ध्यानांत येणार नाहीं, असं मला वाटलं. मला वाटतं, तें काम करतांनाच तुझा तो लाल मफ्लर तिथं पडला असावा. वारा फार सुटला होता म्हणून तुझा मफ्लर गळ्याभोंवतीं गुंडाळून मी गेलें होतें. त्या सर्व धांदलींत तो पडल्याचं, मला वाटतं, माझ्या ध्यानांत आलं नाहीं–

(*अमृत वेड्यासारखा टकमका पहातो आहे.*) अमृत !

(*अमृत तसाच तिच्या चेहऱ्याकडे पहातो.*) त्याला ठार मारून टाक-ल्याचा मला अभिमान वाटतो !

अमृत:– (*त्याचे डोळे गरगर फिरत आहेत, हाताची बोटें वळवळत आहेत.*) मी म्हणतों ना तो फारच सुखानं मेला !– हाल हाल करून त्याला मारायला पाहिजे होता–त्याचे डोळे बाहेर काढायला पाहिजे होते ! प्लेगच्या उंदरासारखा त्याच्या डोक्यावर दगड घालून ठेंचून ठेंचून त्याला मारायला हवा होता ! त्याची तंगडी धरून धुणं धोपटतात तसा धोपटून धोपटून त्याच्या चिंधड्या करायला पाहिजे होत्या ! बदमाष सैतान ! मिरा, तूं त्याला फारच सुखाचं मरण दिलंस ! त्याला – त्याला !–

मिरा:– (*शांतपणें*) अमृत, सुंदरलाल मेला, गेला.–

अमृत:– होय. मेला–गेला–नाहींसा झाला तो. (*उठून उभा रहातो. शांतपणें*) मिरा, तूं कुठतरी नाहींशी हो. सर्व कांही मी माझ्यावर घेतों– (*मिरा उठून उभी रहाते.*) नाहीं तरी आतां मी काय करणार ? (*आग्रहपूर्वक*) जा, पळ, नागपूरला–गोव्याला कुठं तरी जा, मिरा. अजूनही थोडा वेळ आहे. पोलीस केव्हा येतील त्याचा नेम नाहीं.

मिरा:– अं हं. मी नाहीं जाणार.

अमृत:– निदान इथं तरी राहूं नकोस–माझ्याबरोबर तुला सुद्धां विनाकारण पकडतील, नी मग एखादा शब्द जरी अधिक कमी तुझ्या तोंडांतून गेला तरी तू अडकशील–

मिरा:– मीच अडकलें पाहिजे. तूं सुटला पाहिजेस–सुंदरलालला मीं मारला.

अमृत:– पण पोलिसांना त्याची कांहींच कल्पना नाहीं. ते साहा-जिकच मींच खून केला असं धरून चालणार.

मिरा:– तें कांहीं नाहीं. सुंदरलालला मीं मारला.

अमृत:– म्हणजे, तूं स्पष्ट कबुलीजबाब देणार कीं काय ?

मिरा:– अलबत् !

अमृत:–( *तिचे दंड धरून* ) अं हं. मिरा, निदान माझ्यासाठीं तरी तसं करूं नकोस. नाहींतरी जगण्यासारखं आतां मला काय उरलं

आहे ? कुठल्या तोंडानं मी कामगारांपुढं जाऊं ? माझ्या ध्येयाची, माझ्या कार्याची धूळधाण झाली आहे. तुझ्या कबुलीजबाबानं मी नुसता जगेन — कशाला जगूं ? काय करूं जगून ? कसलाच, — कांहींच आधार मला उरला नाहीं.

मिराः— मला तें सर्व माहीत आहे म्हणूनच तुला सोडून मी कुठं जाणार नाहीं.

अमृतः— जरा शांतपणें विचार कर, मिरा. दोघांनींही पोलिसांच्या हातीं जाण्यांत काय फायदा ?

मिराः— नाहीं, - नाहीं, — नाहीं, अमृत ! आत्तांपर्यंत तूं नी मी, — दोघांनीं मिळून सर्व बऱ्यावाईटाला, सुखदुःखांना तोंड दिलं नी आतां — आयुष्यांतल्या या शेवटल्या क्षणाला एकमेकांना सोडून कसं जायचं ?

अमृतः— नको, मिरा, भावनेला बळी पडून भलताच त्याग — (*तिच्या मांडीवर डोकें ठेवतो.*)

मिराः— त्याग ? कसला त्याग ? तूं गेल्यावर मी कशाकरतां जगूं ? कुणाकरतां जगूं ? काय करूं ?

अमृतः— (*स्फुंदत*) मिरा, — लाडके, - माझ्या जिवा, कांहीं झालं तरी तूं जिवत रहावंस असं मला वाटतं — लहान आहेस तूं — नाजुक आहेस तूं — लाडांत वाढली आहेस तूं — माझ्यासाठीं सर्व काबाड-कष्ट, हाल तूं सोसले आहेस नी आतां मरण नको —

मिराः— हात्तिच्या ! केव्हां ना केव्हां तरी मरायचंच आहे. अमृत.

अमृतः— खरं आहे. आज नाहीं तरी उद्यां मरायचंच आहे —

मिराः— मग ? थोडं आधीं मरण आलं तर काय वाईट आहे ?

अमृतः— (*शांतपणें*) खरंच. (*उठून बसतो. डोळे पुसतो.*) आपण माणसं म्हणजे दैवगतीच्या अजस्र सांपळ्यांत सांपडलेले क्षुद्र प्राणी, — जंतू ! यापेक्षां अधिक कांहीं नाहीं. जन्मल्यापासून मरणाच्या धास्तीनं इकडे उड्या मारतों, तिकडे उड्या मारतों — धडपडतों, — अडखळतों — एखादा कागदाचा कपटा नाहींतर एखादा एवढासा मफ्लर सुद्धां आम्हांला कायमचे तोंडघशी पाडायला पुरेसा होतो. सत्याला —